# स्वयं-सेवक

## गद्यपद्यात्मक नाटक

लेखक

भार्गवराम विठ्ठल वरेरकर

प्रथमावृत्ती

---

ऑगस्ट, १९३४.

---

किंमत एक रुपया.

---

बॉम्बे बुक-डेपो, गिरगांव.

प्रकाशक :—

दत्ताराम रामकृष्ण देऊलकर,

प्रोप्रायटर,

बॉंबे बुक-डेपो, गिरगांव, मुंबई.

## लेखकाचीं इतर पुस्तकें.



कथासंग्रह—स्वैरसंचार.

### नाटकें.

कुंजविहारी
संजीवनी
सरस्वती
वरवर्णिनी
चंद्रशेखर ( समर्थ भिकारी )
हाच मुलाचा बाप
लयाचा लय ( नर केसरी )
संन्याशाचा संसार
सत्तेचे गुलाम
पतित पावन ( तुरुंगाच्या दारांत )
नवा खेळ
करग्रहण
करीन ती पूर्व
सोन्याचा कळस
जागती ज्योत
बिल्वमंगल

### लघु नाटकें.

पापी पुण्य
सदा बंदीवान
संसार
नामा निराळा

### कादंबऱ्या.

चिमणी
विधवा कुमारी
परत भेट
धांवता धोटा
गोदू गोखले
कुलदैवत

मुद्रक :—

वी. पी. वागळे, ॲंग्लो-अमेरिकन

प्रिन्टींग प्रेस, हमाम स्ट्रीट, फोर्ट,

मुंबई.

# भूमिका

---

माझ्या "सोन्याचा कळस" या नाटकाच्या कथानकाप्रमाणेंच हें कथानकही असेंच सात आठ वर्षे तिष्ठत राहिलें होतें याचा प्रयोग होण्याचा योगही गेल्या वर्षी आला होता. त्याप्रमाणें यांतील गायनांचे रेकॉर्डही सहा महिन्यापूर्वीच बाजारांत विक्रीसाठीं आले होते; पण नाटक मात्र रंगभूमीवर आतां येत आहे,

गुलामांचा व्यापार हिंदुस्थानांत ज्या स्वरूपांत अजूनही प्रत्येक गांवांगांवांतून चालतो आहे, त्याचें हें अस्पष्टसें चित्र आहे. या विषयावर 'चिमणी' नांवाची माझी पहिली कादंबरी प्रसिद्ध झाली होती.

त्या कादंबरींत 'मुलाला गहाण घेणारा' सावकार सज्जन होता. दुर्जन असल्यावर काय स्वरूप येतें तें या 'स्वयं-सेवकांत'—स्वतःच्या इच्छेने बळेंच नोकर होऊन राहणाऱ्या जगन्नाथाच्या चरित्रांत—दाखविलें आहे.

या विषयाच्या प्रकरणी आमच्या कायदेकौन्सिलांतील प्रतिनिधींचे डोळे उघडणार नाहींत याची मला पूर्ण खात्री आहे—पण असा एक विषय आहे, एवढी सामान्य जनतेला या नाटकामुळें माहिती झाली तरी या नाटकानें मोठेंच कार्य केलें असें मला वाटेल.

निवेदक

मुंबई, हाजी कासमवाडी,
ता. २ ऑगस्ट १९३४

भार्गवराम विठ्ठल वरेरकर.

या नाटकाचा पहिला प्रयोग मुंबई येथें रॉयल ऑपेरा हाऊस मध्यें ता. ९ आगष्ट १९३४ रोजीं ललितकलादर्श मंडळीनें करून दाखविला. त्या वेळीं प्रयोगांत भाग घेतलेल्यांचीं नावें :—

| | |
|---|---|
| **जगन्नाथ—** | व्यंकटेश बळवंत पेंढारकर |
| **रघोजी—** | भीमराव हरी काळे |
| **नागोजी—** | श्रीधर महादेव देशमूख |
| **बाबाजी—** | महादेव हरी जोगळेकर |
| **यादवराव—** | यशवंत विठ्ठल पिंगळे |
| **लहानू—** | अनंत राजाराम कुळकर्णी |
| **पांडू—** | नारायण कृष्ण फाटक |
| **चिमणी—** | गोविंद बाबाजी माशेलकर |
| **मंजुळा—** | भार्गवराम भिकाजी आचरेकर |
| **बायजा—** | रघुनाथ गोविंद शितूत |
| **ऑर्केस्टा—** | सखाराम पांडुरंग बर्वे<br>शंकर आप्पा पेडणेकर<br>रामचंद्र यमनाजी मंगेशकर<br>अनंत तुकाराम माशेलकर |
| **स्टेज मॅनेजर** | बाळकृष्ण मोरेश्वर जोशी<br>दत्तात्रय गणेश सोहनी |
| **स्टेज आर्टिस्ट—** | पुरुषोत्तम श्रीपत काळे |
| **फोटोग्राफर—** | अनंतराव राजाध्यक्ष रेक्स स्टुडिओ |
| **मॅनेजर—** | गोविंद नारायण सोळसकर |

---

**प्रोडयूसर—** व्यंकटेश बळवंत पेंढारकर.

॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥

# स्वयं-सेवक

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

( सुभेदार नागोजीरावांची लायब्ररी. नागोजीराव खुर्चीवर बसला आहे. खोलींत बहुतेक काळोख आहे. )

**नागोजी**—थांब चिमणा, आधीं दिवा मोठा करूं नकोस. मला या प्रकरणाचा पुरा तलास लावायचा आहे. ऐन रात्रीं हा कोण चोर आपल्या खोलींत शिरतो आणि साऱ्या पुस्तकांच्या कपाटाची नुसतीच ढवळाढवळ करतो, तें मला पाहायचं आहे.

**चिमणी**—उगीच तुमची किटकिट. असेल—कुणी येत असेल—ढवळा-ढवळही करीत असेल-पण त्यानं कुठलं पुस्तक चोरलं तर नाहीं. आणि समजा चोरलं-तर काय वाईट झालं—एरव्हीं तरी पुस्तकं कसर खातच पडलीं आहेत ना कपाटांत ?

**नागोजी**—कसर लागली तर माझ्या पुस्तकांना लागेल—कुठल्या कुणा चोरानं तीं कां म्हणून घेऊन वाचावीं ? मी वाचीत नाहीं-एवढंच ना तुझं म्हणणं? बोलून चालून मी पेन्शनर सुभेदार—शिपाई गडी—या नागोजीरावाला पुस्तक वाचायची कधीं जरूरीच पडली नाहीं. कमानीसाहेबांनीं पेन्शन घेऊन जातांना आपली लायब्री मला दिली. वडिलार्जित देवासारखी मी ती जपून ठेवीन—माझीं पोरंबाळं वाचतील-पण कुठला कोण चोर—

**चिमणी**—पोरंबाळं वाचतील म्हणे एकटी काय ती मी मुलगी—

**नागोजी**—उद्यां होतील तुला पोरंबाळं—

**चिमणी**—मी मुळीं लग्नच करणार नाहीं !

**नागोजी**—या गप्पा नकोत माझ्यासमोर ! म्हणे लग्न करणार नाहीं ! मग त्या बाबाजीरावांच्या मगूभोंवतीं कशाला भुणभुणतेस ? परवां त्याच्या

घरावर टांच आणली रघोजीनं—तर मला जामिन राहायला कां सांगितलंस ?

**चिमणी**—हें पहा हं बाबा—असं कांहीं बोलाल तर मी रुसेन हं !—

**नागोजी**—रुस, खुशाल रुस—तेवढीच मला विश्रांति मिळेल.

**चिमणी**—विश्रांति ! कशाला हवी विश्रांति ?

**नागोजी**—हा चोर पकडायला ! तो दिवा बारीक कर पाहूं आधीं ! तो पहा—खिडकीवाटे पहा—आधीं दिवा मालव—( दिवा बारीक करते. क्षण· भर सामसूम. दोघेंही दोन बाजूला लपून राहातात. खिडकीवाटे जगन्नाथ येतो, चोहींकडे पहातो, दार आंतून लावून घेतो व दिवा मोठा करून कपाटांतील पुस्तकें चाळतो. नागोजी व चिमणा त्याच्यामागें राहून पाहातात. नागोजीराव पिस्तूल रोखून म्हणतो. ) हं गडबड करशील तर गोळी झाडीन ! (पाहून) कोण? जगन्नाथ?

**चिमणी**—कोण ? तुम्हीं ?

**नागोजी**—अरे जगू–वेडया–तुला कशाला हवी होती ही चोरी ?

**जगन्नाथ**—क्षमा करा. काय उत्तर देऊं ?

**चिमणी**—खरं असेल तें !

**जगन्नाथ**—तूं गप्प रहा हं चिमणे ! सुभेदारसाहेब, क्षमा करा. हा अभिमान ! खोटा असेल—पण हा मराठयाचा अभिमान ! केविलवाणं तोंड करून तुमच्यापुढं पुस्तकांच्या याचनेसाठीं हात पसरायचं माझ्या जिवावर आलं. मला पाहिजेत तीं पुस्तकें इथं होतीं–मागायचं जिवावर आलं–चोरी तर करायची नाहीं–नुसतीं इथं येऊन वाचतों–पुन:जिथल्या तिथं ठेवतों—

**नागोजी**—अरे, पण सरळ मला विचारलं असतंस तर नसतीं का मी दिलीं ?

**जगन्नाथ**—खरं–पण ती याचना ! भीक मागणं जिवावर आलं. विकत घ्यायची सवड नाहीं. म्हटलं स्वत:च्या कर्तबगारीनं—

**चिमणी**—कर्तबगारी म्हणजे चोरी वाटतं ?

**जगन्नाथ**—तूं गप्प रहा हं चिमणे. स्वत:च्या कर्तबगारीनं मिळवीपर्यंत निदान आपल्या बळावर म्हटलं वाचून घ्यावीं. कसर नाहीं का शिरत कपाटांत तसाच मी !



नागोजी—गडबड करशील तर गोळी झाडीन ! अंक १, प्र. १.

**चिमणी**—कसर का ? ही कुठली कसर ? काटकसर तर नव्हे ?

**नागोजी**—जगू, अरे, तुझा आमचा एवढा घरोबा! माझ्याकडे का संकोच बाळगायचा ?

**जगन्नाथ**—किती उपकार घ्यायचे तुमचे ! तुम्हीं जामिन राहिलांत म्हणून रघोजीरावांच्या तडाख्यांतून अजून घर डोईवर राहिलं आहे. न मागतां तुम्हीं सोइ केलीत, पुस्तकं पुस्तकं म्हणजे काय बाब ? पण तीं माझ्याकडे नाहींत--घ्यायची मला ताकद नाहीं—असं कोणत्या तोंडानं सांगूं ?—मराठ्याच्या कुळांत जन्म घेऊन भिकेसाठीं हात कसा पसरूं ? ( हुंदका आवरतो. )

**चिमणी**—सारं कांहीं माहित असून विचारून घ्यायचं आणि चांगलं हंसरं तोंड रडवायचं. अशी आहे तुमची ही मिलिटरी खोड.

**जगन्नाथ**—काय खटयाळ पोर आहे ! रडत होतों का मी ? पाहिलंत सुभेदारसाहेब, तुम्हीं हिला ही अशी फाजिल करून ठेवली आहे, त्याचा त्रास होतो आम्हां लोकांना.

**चिमणी**—असं बळेंच हंसून कांहीं रडगं लपत नाहीं. उन्हांतल्या पावसा-सारखं गोड दिसतं खरं, पण एकंदरींत केविलवाणंच !

**जगन्नाथ**—मी रडलोंही नाहीं आणि हंसलोंही नाहीं. काय केविलवाणं झालं एवढं ?

**चिमणी**—पुरुषांची जातच खोटी. बायकांसारखं मुळुमुळु रडायचं आणि कबूल मात्र करायचं नाहीं. बेधडक खोटं बोलतां आलं, कीं झाला पुरुषो थाटाचा भडक रंग. असल्या रंगांना फसत नसतों आम्हीं बायका. तुम्हीं रडलांत—टिपं आलीं डोळ्यांतून आणि तीं दिसूं नयेत म्हणून दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेतलंत. आतां कबूल करा किंवा करूं नका.

**जगन्नाथ**—हें पहा चिमणे—असा खटयाळपणा करशील तर असा गाल-गुच्चा घेईन—

**नागोजी**—अरे हो--हो—हो--हो. अरे, मला म्हाताऱ्याला बोलूं द्याल कीं नाहीं—! हें पहा चिमणे, प्रसंग तसाच आला म्हणजे पुरुष काय किंवा बायका

काय—दोन्हीही सारखेच. पुरुषांचं आंतड लोखंडाचं आणि बायकांचं कापसाचं–असं थोडंच असतं ! आंतड्याला पीळ पडला कीं डोळ्यांवाटे टीप यायचं. अग, आम्ही बेधडक एवढी माणसं कापणारे लोक—पण शेजारचा शिपाई गोळी लागून पडला तर रडत होतों.

**चिमणी**—तरीही म्हणे शूरमर्द शिपाईगडी. आम्हां बायकांची अक्कल घ्या थोडी. प्रत्यक्ष नवरा मेला तर त्याची चिता स्वतःच्या हातानं रचून आम्हीं बायका सती जात असतों.

**नागोजी**—कुठल्या ग तुम्हीं बायका ? केव्हांच्या गोष्टी सांगते आहेस या ? अजून लग्नाला नाहीं ठावठिकाणा आणि गोष्टी बोलते आहे सती जायच्या ! नवऱ्याची गोष्ट राहिली दूर. काल या जगूचं घर लिलांव होऊन जाणार म्हणून माझ्याजवळ सांगून कोण रडत होतं तें ? आतां कां तोंड फिरवलंस ? अरे जगू, मी सांगतों तुला--तूं हिच्या बातांवर एक काडीभर सुद्धां विश्वास ठेवूं नकोस.

**जगन्नाथ**—ही माझ्यासाठीं तुमच्याकडे रडली ! माझ्यासाठीं ?—चिमणे, माझं घर जाईल म्हणून तुला वाईट वाटलं ? गेलं असतं माझं घर—मी भिकारी झालों असतों—मला कॉलेज सोडावं लागलं असतं–कदाचित तुमच्या शेतावर मजूर म्हणून उद्यांपासून मी काम करायला आलों असतों, पण त्यासाठीं तूं कां रडलीस ?

**चिमणी**—भूतदया— ( जीभ चावून स्वस्थ राहते. )

**जगन्नाथ**—तुला दया आली माझी ? कां ?—तुमच्या दारीं रोज एवढे भिकारी येतात त्यांच्यासाठीं कुठं तुला एवढी दया येत नाहीं ती ? त्यांच्यासाठीं जामिन राहायला यांना कुठं सांगितलं नाहींस तें ? तुझ्या भूतदयेनं माझं घर थाऱ्यावर राहिलं !

**नागोजी**—असा परक्यासारखा काय बोलतोस जगू ? तुझा बाप आणि मी लहानपणापासूनचे दोस्त—दोघे भाऊच म्हणेनास—तुमच्यासाठीं नुसता जामीन राहिलों रघोजीकडे, यापेक्षां मी जास्त काय केलं ? त्याबद्दल एवढं वाईट कशाला वाटलं तुला ?

**लहानू**—मला हेरलीच नाहीं पगा, हेरली असती तर म्या दिली नसती का भिरकावून ?

**रघोजी**—( त्याला फटकारून ) हेरली नाहीं म्हणे ! डोळे फुटले होते का ? तोंडघशीं पडलों होतों मी ! नुसतं गिळायचं समजतं—काम नको करायला—( पुन्हां मारतो. )

**यादव**—काय हा निर्दयपणा ! गुरांनामुद्धां कुणी असं वागवित नाहीं.

**रघोजी**—नाहींच वागवीत. गुरांना अक्कल तरी असते. मानेवर जोखड ठेवलं, कीं मुकाट्यानं कामाला लागतात. पण हे हुजरे—हरामखोर बेटे ! पगाराला पुढं आणि कामाला सदान्‌कदा मागं पाऊल.

**यादव**—मी खेडयांची स्थिती पाहाण्यासाठीं मुद्दाम दिल्लीहून आलों आहें, हें आपण जाणतच आहां. रघोजीराव, दिल्लीला जाऊन मीं हाच रिपोर्ट देऊं का ? मी आज आठ दिवस तुमच्या घरीं पाहुणा म्हणून राहिलों आहें. मी तुमचं अन्न खाल्लं आहे आणि तुमची निंदा करणंच मला तुम्हीं भाग पाडणार का ?

**रघोजी**—तुम्हीं दिल्लीला जाऊन माझी निंदा केली म्हणून इकडे माझ्या शेतांतलीं कणसं कांहीं करपून पडणार नाहींत—

**यादव**—पण जगभर तुमची बदनामी होईल. खेडयांची स्थिती कशा रीतीनं सुधारतां येईल याची पाहणी करणं हें माझं कर्तव्य आहे आणि तसं करतांना मला बऱ्याच अप्रिय गोष्टी नाइलाजानं बाहेर काढाव्या लागणार आहेत.

**रघोजी**—खुशाल काढा. कोण लेक नको म्हणतो आहे ? तुम्ही वाटेल तेवढया बोंबा मारल्यात तरी आमचं हें असंच चालायचं आणि हें असंच चालतं आहे तोंपर्यंतच आमचा बोज आहे. उद्यां हा हंटर बाजूला ठेवला तर कुत्रासुद्धां आमच्या शद्बाला भीक घालणार नाहीं.

**यादव**—किती दिवस तुमच्या या मौजा चालतात हेंच आतां आम्हांला पाहायचं आहे. या माझ्या पाकिटांत जर्मन कारखान्यांचे एक्याण्णव कॅटलॉग आहेत एक एक यंत्र आणून जर या कुणब्यांना दिलं तर एक वर्षाच्या आंत ते तुमच्या गुलामगिरींतून मुक्त होतील.

**रघोजी**—फुकट देणार आहांत का हीं यंत्रं ?

**यादव**—अर्थातच नाहीं. यंत्राची किंमत कांहीं फार नाहीं—साधारण सात-आठशांना एकेक यंत्र यायला कांहीं हरकत नाहीं.

**रघोजी**—हे सातआठशें आणणार कुठून हे लोक ? कर्ज काढायला आमच्याकडेसच यायला हवं. या भिकारडयांना कर्ज द्यायचं तरी कसल्या आधारावर? तुम्हीं राहाणार आहांत का जामीन ? सात रुपये देखील कुणी यांना कर्जाऊ देणार नाहीं. लहान्या, इकडे ये. किती वर्षं माझ्याकडे नोकरी करतो आहेस ?

**लहानू**—तीन वरसं झालीं पघा.

**रघोजी**—कां करतोस नोकरी माझ्याकडे ?

**लहानू**—रीण हाय ना देयाचं ! शंभर रुपये काढल्याती शेतापायीं. शिवाय त्येचं याज. याजांत नोकरी चालूलिया आन् मुद्दलाचं काय व्हनार परमेसराला ठावं !

**रघोजी**—ऐकलंत ? ही झाली या कुणबटांची हकिकत. आतां घरंदाज इनामदारांची गंमत पाहायची असेल तर चला या माझ्याबरोबर. लहान्या, रस्ता साफ कर. अगदीं खालीं पाहात चाल.

**लहानू**—अन् म्होरनं गुरं आल्याती तर ?

**रघोजी**—तर तीं मी पाहिन. माझी नजर वर आहेच. हं, हो पुढं.

( जातात )

---

# प्रवेश तिसरा.

( स्थळ—जगन्नाथाचें घर—बायजाबाई आणि मंजुळाबाई )

**मंजुळा**—अगदीं वीट आला आहे या जिण्याचा. मेलं सदा सुतकी घर. आतां तुम्हींच सांगा बायजाबाई, कसे दिवस काढावे अशा या स्थितींत ?

**बायजा**—मंजुळाबाई, कांहीं झालं तरी आपलं घर तें आपलं घर. माहेरचा पडप किती दिवस चालणार ? तुमच्या माहेरीं मोठं साता राजांचं राज्य असेल, चौदा चौकडयांची जहागीर असेल, पण सासरची सर त्याला येईल का ? कांहीं झालं तरी इथं तुमची सत्ता आहे. माहेरीं काडीची तोड करायलासुद्धां वडील भावांची परवानगी विचारावी लागणार.

**मंजुळा**—बाबानीं मला खाईंत कां लोटलं नाहीं यापेक्षां ? जहागीरदारी होती ना जळत ! अन् मेल्या या म्हातारडया मढयाच्या गळ्यांत अडकवली !

**बायजा**—असं म्हणू नये मंजुळाबाई. किती झालं तरी ते आपले धनी आहेत त्यांच्या नांवावरच ना हें कपाळभर कुंकू लावायचं ? तें आहे तोपर्यंतच साऱ्या मिरवणुकी ! कुंकवाच्या या इवल्याशा टिळ्यासाठीं आलीं दु:खं मुकाटयानं गिळावीं लागतात. मी तुम्हांला काय सांगणार ? आम्हीं भिकारी माणसं. तुमच्या कृपेनं या चार कौलांच्या छपराच्या सांवलींत राहिलों आहोंत. उद्यां तुमच्या ह्यांची मर्जी फिरली तर झाडाखालीं तीन दगड मांडावे लागतील आम्हांला.

**मंजुळा**—तेंदेखील मला पत्करेल, पण असलं हें मेलं मरतुकडं जिणं पुरे झालं. आतां हेंच पहा. हा मुंबईफ्याशनचा बुचडा बांधला आहे—ही वेणी घातली आहे माथ्यांत-तर डोक्यावरून पदर घेतलाच पाहिजे म्हणून आकाशपाताळ एक करायचं. डोक्यावरून पदर घ्यायचा तर बुचडा तरी कशाला बांधायचा तो ! नुसती गांठ मारून टाकली तरी नाहीं का व्हायचं ?—किंवा मोकळेच सोडले केंस तरी देखील कुठं बिघडतं आहे ?

**बायजा**—नाहीं आवडत त्यांना तर नये करूं. तेवढयानंच काहीं अगदीं अडून रहात नाहीं ना ?

**मंजुळा**—कां अडून रहात नाहीं ? मी काय यांच्यासारखी अगदीं झाली आहे ? यानां मात्र अगदीं काळाकुट्ट कलप लावून मिशांना पीळ भरायला हवेत आणि आम्हीं मात्र तेवढे उलटे बुचडे बांधून बुचडे उघडे ठेवले तर यांचे डोळे

फुटतात ! उद्यां मी यांना म्हटलं, कीं मिशीवर रुमाल बांधून येत जा, तर हे ऐकतील का माझं ?

**बायजा**—असं म्हणूं नये मंजुळाबाई. किती झालं तरी ते आपले घरधनी आहेत.

**मंजुळा**—ते घरधनी—आणि मी नाहीं का घरधनीण ! त्यांचं मात्र मी ऐकायचं आणि त्यांनीं नको का माझं कांहीं ऐकायला ? अहो, माझं वय का झालं आहे ? कशाला हो यांना तरणी बायको हवी होती ? लग्नाशिवाय राहवत नव्हतं, तर पाट लावायचा होता कुणा सटवाईबरोबर. कां माझ्या जन्माचं असं मातेरं करावं यांनीं ! मला काय जीव नाहीं–कीं प्राण नाहीं–कीं हौसउमेदी नाहींत ?- कां–कां म्हणून माझा असा छळ चालवला आहे ? सहन करायला तरी कांहीं सीमा आहे ना ?

**बायजा**—काय उत्तर द्यावं तुम्हांला हेंच मला कळत नाहीं.

**मंजुळा**—काय उत्तर देणार ? उत्तर द्यायला तुम्हांला जागा असेल तेव्हां ना ?

**बायजा**—माझ्या दुःखाखालीं मीच खचून गेलें आहें. सोन्यासारखा माझा मुलगा–त्याला आतां शाळा सोडावी लागणार. आयुष्याचं मातेरं होणार बिचाऱ्याचं. आम्हीं अशीं ही दुर्भागी निपजलों त्याचीं फळं त्याला भोगावीं लागणार. घरदार गेलं तरी त्याचं मला कांहीं वाईट वाटलं नसतं पण पोराचं पुढलं आयुष्य फुकट जाणार हें मनांत आलं कीं काळीज कसं चर्र होतं

**मंजुळा**—हे देखील त्यांचेच प्रकार ! स्वतःच्या बायकोची ज्यांना दया नाहीं त्यांना दुसऱ्याच्या मुलांचं कल्याण काय होय ! आणि यांची आज्ञा पाळावी म्हणून तुम्ही मला सांगतां ? असंच हें चालू राहिलं तर एक दिवशीं कुठं तरी तोंड घेऊन निघून जाईन. मग बसा म्हणावं रडत. तोंड दाखवायला जागा राहायचीं नाहीं यांना सुखाचा संसार व्हायला बायकोला सुखांत ठेवावं लागतं आणि तसं नाहीं ठेवलं तर त्याचे परिणाम काय होतात हें पाहूंदेच त्यांना एकदां. ( रघोजीराव, यादवराव व लहानू येतात )

**बायजा**—अग बाई ! रघोजीराव—

**रघोजी**—इकडे आली आहे का आपली खिडका ? बायजाबाई, तुमची फूस आहे का यांना ? पदर कशाला ओढतां पुढं ? हिला' तेवढं पदर उडवायला शिकवायचं आणि आपण सव्वा हात बुरखा ओढायचा, यानं मी फसेन असं मात्र समजूं नका,

**बायजा**—मी काय सांगत होतें त्यांना तें आपणच विचारा.

**रघोजी**—उंदराला मांजर साक्ष ! अगदीं सत्यवादी हरिश्चन्द्राचीच साक्ष ! कां ?वाचा फुटली नाहीं वाटतं अजून ? मी आलो आहें इथं. दिसलं कीं नाहीं ? पदर नाही घेतला डोक्यावर अजून ?

**मंजुळा**—मी नाही घेणार पदर. मला नाहीं आवडत.

**रघोजी**—तुमची आवड कुणी विचारली होती ? आमचा हुकूम काय आहे ? मराठमोळ्याची काय रीत आहे ? थंडपणें बोलतो आहे मी, म्हणून चढून जाऊ नका. मला दुसराही आवाज काढतां येतो. पण त्याची जागा ही नव्हे.

**मंजुळा**—सारे आवाज माहित आहेत मला. असले कितीही आवाज काढलेत-प्रत्यक्ष बंदुकीचा आवाज काढलात, तरी देखील मी डोक्यावर पदर घेणार नाही.

**यादवराव**—रघोजीराव, काय हें ? आपण परठिकाणी आलों आहोत. घरीं काय वाटेल तें बोला--पण दुसऱ्याच्या घरीं हे असं बरं दिसत नाहीं.

**रघोजी**—आणि दुसऱ्याच्या घरी हिनं मराठमोळ्याच्या चालीविरुद्ध वागलेलं तेवढं मात्र बरं दिसतं तुम्हांला ? तें कांहीं नाही. ( हंटर सरसावित ) पदर डोक्यावर घेतलाच पाहिजे.

**बायजा**—मंजुळाबाई, पतीच्या आज्ञेबाहेर वागणं-आणि त्यांतूनही असा चारचौघांत त्यांचा उपमर्द करणं, हें मराठ्याच्या मुलीचं शील नव्हे. तो पदर घ्या पाहूं डोक्यावरून. ( मंजुळा पदर घेते )

**रघोजी**—आतां निघाव घरीं. लहानू यांच्याबरोबर जा.

**मंजुळा**—एकदां ऐकलं आहे तुमचं. पण यापुढं साफ ऐकणार नाही. काय करायचं तें एकदां करून टाका म्हणावं. चापट्या खाऊन झाल्या आहेत पोटभर.

आतां तेवढा चाबूक आणि शेवटी बंदुकीची गोळी खाल्ली कीं —( बायजाबाई तिला वळेच बाहेर घालवते. )

**रघोजी**—पाहिलंत ? हिचं ऐकते —माझं ऐकत नाहीं. म्हणूनच म्हणतों ही पदर उडवायची फूस हिची.

**बायजा**—वाटेल तें म्हणावं-त्याला कोण मना करतं आहे ? खरं काय आहे आणि खोटं काय आहे हें कुणी कबूल केलं नाहीं तरी देवाला ठाऊक आहे.

**रघोजी**—बरं-बरं मला सर्व कळतं. असल्या चांभारचवगाईला फसण्याइतका मी मूर्ख असतों तर या असल्या गावांत तुम्ही लोकांनीं माझे तीनतेरा आणि पांचपंधरा करून उडवले असते. पण मी तुम्हां सर्वांची बराशी जेवून बसलों आहें म्हणावं!—बाबाजीराव कुठं आहेत ?

**बायजा**—बाहेर जाणं झालं आहे. इतक्यांत येणं होईल, तोंपर्यंत बसायचं म्हटलं. थोडं गुळपाणी घेऊन येतें. ( आंत जाते )

**रघोजी**—आतां गुळपाणी पाजून ही माझं तोंड गोड करणार ! असल्या गोड तोंड करूं पाहणाऱ्या माणसांना फार भ्यावं लागत बरं यादवराव हा आदर-सत्कार चालला आहे ! तुला जुलमाचा रामराम आहे हा ! माझं तोंड गोड करतें म्हणे ! यादवराव, मी उद्यां मेलों तर या घरांतलं प्रत्येक माणूस गांवभर पेढे वाटील ! आणि गुळपाणी देतें म्हणे ! विषदेखील द्यायची त्यांतून— हात लावूं नका. बरी शंका आली. नकोच —नकोच तें गुळपाणी. विषप्रयोगाचाच बेत दिसतो हा. ( बाबाजीराव येतो ) आलांत ? या.

**बाबाजी**—रामराम—रामराम पाव्हणे ! केव्हांसं येणं झालं ? अग ए, थोडं गुळपाणी घेऊन ये. ऐकलंस का ? ( आंत जातो )

**रघोजी**—पाहिलंत यादवराव, दोघांनीं कट केला आहे. अगदीं शंकाच नाहीं. गुळपाणी अं ! मी आलों कीं गुळपाण्यांतून मला विष चारायचं ठरवलं आहे का ? ( बाबाजी येतो ) तुमचं गुळपाणी नको आहे मला. ठेवा तें तिकडे दूर. असे वसा इथं. मला आज अगदी उघडपणें सारा व्यवहार मोकळा करून घ्यायचा आहे.

**बाबाजी**—आतां आजच काय त्याचं एवढं अडलं आहे. ? आज जामिनगत पटली आहे—

**रघोजी**—जामिनगत नुसती जमीपुरती. तेवढी आज जमा थोपवून धरली. पण मूळ मुद्दलाचा कांहींतरी निकाल केला पाहिजे कीं नाहीं ?

**बाबाजी**—मी देणं नाकबूल कुठं केलं आहे ?

**रघोजी**—तुमचा बाप कबूल करील. रजिस्टर झालेलं खत आहे माझ्याजवळ. उरावर बसून पैन पै वसूल करून घेईन. जामीन पटला म्हणजे कांहीं पैसे फिटले नाहीत ! पैसे फेडायची काय व्यवस्था करतां ? बोला. आठ दिवसांत रोख्याची मुदत सपते आहे. ती संपली की घर गहाण आहे तें खरेदी होऊन जातं आहे. दखोटीला धरून घराबाहेर काढीन. कध्धी सोडणार नाही.

**बाबाजी**—कांहीं पूर्वीची आठवण—

**रघोजी**—पूर्वीची आठवण दांतावर मारतोस माझ्या ! पूर्वीची आठवण आहे म्हणूनच म्हणतों, तंगडी धरून बाहेर काढीन घराबाहेर ! या घरांत मी पूर्वी हुजऱ्या होतों. तुझ्या बापानं माझे कान पिळले आहेत—थोबाडींत दिल्या आहेत. ती कानाची शिवशिव अझून कायम आहे—तं गालांचं झणझणणं अझून कायम आहे. ती पूर्वीची आठवण--पूर्वीची आठवण आहे म्हणूनच या घराबाहेर काढून तुम्हाला भयाभया भटकायला लावणार आहें.

**बाबाजी**—खाल्ल्या अन्नाला जागणं तें हेंच का ?

**राघोजी**—अन्न काय फुकटचं खात होतों ? चांगली कंबरडं मोडून नोकरी करून घेतली आहे माझ्याकडून. ती पूर्वीची आठवण माझ्या दांतावर मारतोस ? अन्नाला जागा म्हणे अन्नाला ! त्या अन्नालाच जागतों आहें ! तें अन्न आठवलं म्हणजे चांगली जाग येते मला—झोपेंत सुद्धां जाग येते ! बोल—पैसे चुकते केव्हां करणार ?

**बाबाजी**—पैसे कुठून आणूं ?

**रघोजी**—तर मग घर खालीं करायला तयार हो.

**बाबाजी**—त्यावेळीं पलटणींत शिरलों असतो तर मेजर सुभेदार झालों असतों.

पण या घरच्या मोहानं घरीं राहिलों, वडिलानीं लावलेल्या झाडाचा आसरा सोडायचा नाहीं म्हणून गळ घेत राहिलों, त्याचा हाच का परिणाम ! रघोजीराव, दया नाहीं तर नाहीं, पण नुसती माणूपकी तरी थोडी दाखवाल ?

**रघोजी**—हा व्यवहार आहे—व्यवहार आणि माणुसकी हे दोन शब्द एका जागीं येऊं शकत नाहींत. माणुसकी दाखवित गेलं, कीं व्यवहाराचं खोबरं झालंच म्हणून समजावं. आतां व्यवहारी माणुसकीनं बोलायला जर तयार असाल तर मला कांहीं करतां येईल की नाहीं तें पाहतो.

**बावाजी**—व्यवहारी माणुसकी कशी काय असते ती मला कुठून कळणार ? मी व्यवहार जर केलाच नाहीं—

**रघोजी**—माणुसकी तर दाखवायची आणि व्यवहार मात्र सोडायचा नाहीं असा एक सवाल मी टाकणार आहे—पटला तर तुमचं घर तुमच्याकडे राहील. नाहीं तर काय व्हायचं तें ठरलंच आहे. यादवराव, आमच्या या कुळकथा ऐकून तुम्हीं कंटाळलां असाल ?

**यादवराव**—छेः छेः मुळींच नाहीं. मी खेडेगांवची पाहणी करण्याकरितां आलों आहें हें तुम्हीं विसरतां. या विषयांत मला फार जिज्ञासा उत्पन्न झाली आहे आणि आपल्या अजब बुद्धीच्या जोरावर आपण हें कोडं कसं काय सोडवणार आहांत, याच्याकडे माझं सारं चित्त वेधून राहिलं आहे

**रघोजी**—असं असेल तर ठीकच आहे. नाहीं तर कंटाळलां असाल तर—

**यादवराव**—छेः छेः कंटाळण्याचं नांवच नको. मी अगदी लक्षपूर्वक सर्व गोष्टी ध्यानीं घेतों आहें.

**रघोजी**—बावाजीराव, ऐका. तुम्हीं मला तीनशें रुपये देणं आहांत. त्याबद्दल तुमचं घर माझ्याकडे गहाण आहे. रकमेचं आजपर्यंतचं व्याज एक वर्ष सोडून मला पोंचलं आहे. या वर्षाच्या व्याजाची मी तुम्हांला सूट देऊं शकेन. रकमेची भरपाई आठ दिवसांत झाली नाहीं तर हें घर माझ्याकडे खरेदी हक्कानं येतं आहे. तें तसं न येण्याला एकच उपाय म्हणजे हीं रक्कम आतांच फेडणं—

**बावाजी**—तें तर मुळींच शक्य नाही.

**रघोजी**—ठीक. आतां ही रक्कम हप्त्याहप्त्यानं फेडून घ्यायची माझी तयारी आहे. दरमहा पंचवीस प्रमाणें या रकमेची फेड करतां येईल. माझ्या अटीनुरूप जर ही फेड दरमहा करीत असाल तर थकलेल्या वर्षाचं आणि फेडीच्या वर्षाचं अशीं दोन्हीं वर्षांचीं व्याजं सूट द्यायची माझी तयारी आहे. आहे कबूल ?

**बाबाजी**—कबूल. पण दरमहा पचवीस तरी कुठून आणूं ? पोटाचीच जिथं पंचाईत—मुलाचीं शाळा कशी चालणार हेंच जिथं संकट, तिथं दरमहा पंचवीस—

**रघोजी**—दरमहा पंचवीस फेडण्याचा उपाय मी सांगतो, ऐका. तुमच्या जगूला हें कितवं वर्ष ?

**बाबाजी**—सतरावं नुकतंच संपलं. पण कृपा करून त्याला या भानगडींत गुंतवूं नका

**रघोजी**—अठरा वर्षं पुरीं होईपर्यंत तुम्हीं त्याचे पालक आहांत. त्यापुढं त्याचा तो मालक होईल. हीं अठरा वर्षं पुरीं व्हायला अजून एक वर्ष आहे. आहे ना ?

**बाबाजी**—होय. पण तुम्हीं त्याचं नांव कां घेतां या व्यवहारांत ?

**रघोजी**—तेंच आतां सांगतो. मला तुमचा लेखी करारनामा पाहिजे. तसा करारनामा तयार करून मी बरोबर आणला आहे. हे यादवराव त्यावर साक्ष घालतील.

**बाबाजी**—कसला करारनामा ?

**रघोजी**—करारनामा कसला—नोकरनामाच म्हणाना ! तुमच्या जगूनं एक वर्ष—म्हणजे त्याच्या वयाचीं अठरा वर्षं पुरीं होईपर्यंत माझ्या घरीं नोकरी करावी. पंचवीस रुपये देण्याइतकी जरी त्याची लायकी नाहीं, तरीही पूर्वीची आठवण जागवून मी तेवढी झीज सोसायला कबूल आहें. एक वर्ष पुरं होतांच तुमचा मुलगा तुमच्या घरी येईल आणि तुमचा रोखा मी फाडून देईन. कसं ?

**बाबाजी**—अरे सर्पा ! पूर्वीची आठवण का ? जुना सूड उगवण्यासाठीं मला माझ्या मुलाला गहाण द्यायला लावतोस का ? नाहीं—प्राण गेला तरी मी हें कबूल करणार नाहीं.

**रघोजी**—( उठून ) ठीक आहे. घर खालीं करायची तयारी ठेवा. चला यादवराव.

**बायजा**—( बाहेर येऊन ) माझं ऐका. मी एक वर्ष तुमच्या घरीं मोलकरीण म्हणून राबतें.

**रघोजी**—म्हणजे माझ्या बायकोला फुसलावून बिघडवायला तेवढीच संधि मिळेल नाहीं ? मी इतका गाढव नाहीं !

**बायजा**—भलतीच कुशंका कां घेतां ? मी तुमच्या पायां पडतें. एवढी भीक घाला आणि आम्हांला ऋणमुक्त करा.

**रघोजी**—जो माझा शब्द गेला तो गेला. त्यांत बदल होणं शक्य नाहीं. वाटल्यास कबूल करा, नाहींतर हा मी चाललों. एक वर्ष कांहीं फार नाहीं. एक वर्षानं मुलगा घरी परत येईल. पुन: अभ्यासाला लागेल. एक वर्ष नापास झाला म्हणून समजा. पण माझी अट न ऐकाल तर पोराचं जन्माचं नुकसान करून बसाल.

**बाबाजी**—एवढं कबूल केल्यावर मग रोखा फाडून देतां येईल ना ?

**रघोजी**—मग ? आतांच. वर्षाची अटही मागं घेतो. नोकरनाम्यावर सही होतांच रोखा फाडून देतो असं करतांना मला एक धोका पत्करावा लागतो आहे एक वर्षापूर्वी जगू मेला—डोळे कां झाकतां ? ऐका—जगू मेला तरीही तें नुकसान सोसण्याची माझी तयारी आहे. एवढा स्वार्थत्याग करायला मी तयार झाल्यावर, जर तुम्हीं माघार घेणार असाल, तर मी म्हणतो, दुर्दैव तुमचं न तुमच्या पोराचं.

**बाबाजी**—काय करूं ?—काय करूं ?—

**रघोजी**—हा घे कागद—सही कर. ( पेन देतो ) डोळे मीट आणि सही कर. हं, घे पेन हातांत. कर सही—कर सही ! काय यादवराव ?

**यादवराव**—बरोबर आहे. आपल्या अटी अगदीं पूर्णपणें व्यावहारिक आहेत,

( बाबाजी कागद घेऊन वाचूं लागतो. तो वाचित असतांना-)

**बायजा**—नका हो नका. आपल्या हातानं पोराला असा गहाण टाकूं नका-असा विकूं नका. गेलं घर तर जावो—दारोदार भीक मागून खाऊं पण पोराला



रघोजी—सही कर—माझें ऐक—सही कर.          अंक १, प्र. २.

असा आपल्या हातानं गुलाम करूं नका. पूर्वीचा सूड उगवण्यासाठीं हा मांग त्याला चावकाखाली वडवील कीं हो ! माझं कोवळं पोर एका महिन्यांत अर्धमेलं होऊन जाईल. तो पाहिलात का त्याचा चावूक ! सापासारखा दिसतो आहे मला-या सापाच्या चाव्यानं माझं गरीब पोर जिवाला मुकेल हो ! काय वाचतां ?—फेंका तो कागद. जळो हें घर आणि आग लागो या संसाराला !

**बाबाजी**—( पुटपुटत ) एक वर्षांत तरी परत शिकायला जाईल—पास होईल—नांवालौकिकाला येईल—हें एक वर्ष त्यावेळीं सहज विसरून जाईल

**बायजा**—कसा विसरेल ? बापानं आपलं रक्त विकून घर सोडवलं हें आठवतांच कसलं त्याचं आमच्याबद्दल प्रेम राहणार ? थांबा हो थांबा–निदान त्याला तरी विचारा,

**रघोजी**—या क्षणाला सही कर. नाहीं तर हा मी निघालों.

**बाबाजी**—काय करूं ?

**रघोजी**—सही कर.

**बायजा**—नका—सही करूं नका ( सही करतो ) केलीत सही—हाय रे देवा ! ( पडते )

**रघोजी**—हा तुझा कर्जरोखा हा घे फाडून देतों. उद्यां सकाळी सहा वाजतां जगूला माझ्या घरीं पाठवून दे. समजलं ? चला यादवराव. थांबा, याच्यावर साक्ष घाला—( यादवरावानें सही केल्यावर ) रामराम—बाबाजी, पूर्वीची आठवण स्मरून मी माझ्या दानतीला जागलों आहें, एवढं तरी आतां कबूल करायची तुझी तयारी आहे का ?

**बाबाजी**—( दांतओठ खात ) पूर्वीची आठवण–पूर्वीची आठवण !—

**रघोजी**—रामराम–येतों आतां. अरे त्या बायकोच्या डोळ्यांना पाणी लाव. सावध कर तिला. रामराम—उद्यां सकाळी बरोबर सहा वाजतां—बरं का ? रामराम ! [ दोघे जातात ]

**बाबाजी**—पूर्वीची आठवण ? काय केलं मी हें ?—एकलंस— अग ए—डोळे उघड. उठून बैस. जगू येईल आतां—

**बायजा**—( ताडकन् उठून ) कुठं आहे माझा बाळ जगू ?

**बाबाजी**—हें पहा--मी मांग आहें- कसाब आहें- खाटिक आहें. कळलं ? मी खाटिक आहें. मी माझ्या हातानं माझं पोर खाटकाला विकलं आहे. आतां येईल तो. हें तोंड त्याला दाखवायला मला लाज वाटेल—

**बायजा**—काय हो केलंत हें ?

**बाबाजी**—काय केलं तें तुला एकदां सांगितलं ना--माझ्या गोठ्यांतली पारडी मी खाटकाला विकली. कळलं ? आतां तूंच त्याला सांग. मी हें तोंड त्याला दाखवणार नाहीं. समजलं ? माझं तोंड काळं झालं आहे. त्याचं माथं देव उजळ करो. अशी रडूं नकोस-मन घट्ट कर आणि नवऱ्याची अब्रू राख—बाप कसाब असतो म्हणतात-त्यालाही तसंच वाटेल. तसं वाटूं देऊं नकोस त्याला. ऐकलस ? त्याला तसं वाटूं देऊं नकोस. समजलीस ? आतां आपण एकटीच पडलों. आतां आपल्या सांगातीं कोण ? जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती—चालवीसी हातीं धरूनीयां-ऐकलंस ? मी जाऊन पडतों खोलींत. सकाळी सहा वाजतां काय समजलीस ? सकाळीं सहा वाजतां—('सकाळीं सहा वाजतां' असें पुटपुटत जातो)

**जगन्नाथ**—( प्रवेश करून ) आई, आई, मी आज अगदी खुषींत आहें.

**बायजा**--(हुंदका आवरीत हंसण्याचा प्रयत्न करते) असं का ? काय झालं ?

**जगन्नाथ**—काय झालं तें आधीं सांगणार नाहीं. बाबा कुठं आहेत ?

**बायजा**—डोकं दुखतं आहे म्हणून आंत—पण असं काय झालं ?

**जगन्नाथ**—आधी भाकर खाऊन घेऊं. बाबांना हांक मारूं का ?

**बायजा**—त्यांना आज भाकर खायची नाहीं. डोकं दुखतं आहे—

**जगन्नाथ**—आई !

**बायजा**—काय बाळ ?

**जगन्नाथ**—तुझं तोंड असं उतरलेलं कां ? बाबांची प्रकृती फार का बिघडली आहे ?

**बायजा**—छो:रे, उगीच कुठं जरा डोकं दुखतं आहे.

**जगन्नाथ**—मग तुझा चेहरा असा कां ? आई, काय झालं ?

**बायजा**—कांहीं नाहीं. आधीं भाकर आणतें.

**जगन्नाथ**—नको—राहूं दे. आधीं मला सांग. काय प्रकार झाला आहे ? मी माझ्याच आनंदांत होतों. तुझ्याकडे पाहायलासुद्धां विसरलों. आई, तुझा चेहेरा असा गोरामोरा कां ? हें पहा, ओंठ चावलेस ! सांग ना आई काय झालं ?

**बायजा**—(एकदम गहींवरून त्याला कवटाळते) जगू, आम्हीं कसाब आहोंत रे ! कसाबाहून कसाब—खाटकाहून खाटीक ! मांग—राक्षस—दैत्य—काय देशील तीं विशेषणं थोडीं आहेत.

**जगन्नाथ**—आई, स्पष्ट काय तें सांग ना ! कां माझा अंत पाहातेस ?

**बायजा**—विकलं—गहाण टाकलं—

**जगन्नाथ**—घर ना ? खुशाल जाऊं दे घर. देवाची दया होईल तर दुसरं घर बांधूं. आई, देवानं मला रस्ता दाखवला आहे, आतां मी निर्भय झालों, बेहत्तर घर गेलं तर—माझी शाळा बुडत नाहीं आणि तुम्हींही उपाशीं पडत नाहीं.

**बायजा**—घर नव्हे—जगू—घर नव्हे !—

**जगन्नाथ**—घर नव्हे ? तर काय विकलं ?

**बायजा**—तुला विकलं. बाळ, आम्हीं कसाबानीं तुला गहाण टाकलं.

**जगन्नाथ**—काय म्हणतेस आई ? मला गहाण टाकलं ? कसं ? कुणाकडे ?

**बायजा**—रघोजीरावांकडे—

**जगन्नाथ**—रघोजीरावांकडे ? मला गहाण टाकलं ? म्हणजे काय केलं ?

**बायजा**—त्यानीं कर्जरोखा फाडून दिला. आम्हांला कर्जमुक्त केलं.

**जगन्नाथ**—मग गहाण कां टाकलं ?

**बायजा**—गहाण टाकलं म्हणूनच कर्जमुक्त केलं.

**जगन्नाथ**—मला गहाण टाकलं म्हणून कर्जमुक्त केलं ? म्हणजे काय ?

**बायजा**—म्हणजे एक वर्ष तूं त्यांच्याकडे नोकरी करायची—काय सांगूं बाळ ?—

**जगन्नाथ**—समजलों. त्या मांगानं असा आमचा गळा कापला. तो एके वेळीं आमच्या घरीं हुजऱ्या होता म्हणून मला त्यानं आपल्या घरचा हुजऱ्या

करून घेतलं. असा सूड उगवला अं ? आई, केवढी चूक केलीत ही !

**बायजा**—मी नाहीं—मी किती विनवलं—पण त्या मांगानं तसंच त्यांना पकडींत धरलं आणि सही घेतली.

**जगन्नाथ**—मी येण्याची तरी वाट पहायची होती मला विचारायचं तरी. कारण सांगायचं होतं.

**बायजा**—तेंच मी म्हणत होतें. पण तो अगदीं वदेळीवर आला आणि यानीं सही केली.

**जगन्नाथ**—आई, मी गुलाम झालों. कारण नसतांना मी गुलाम झालों—

**बायजा**—तुझ्यासाठीं—तुझ्या शिक्षणासाठीं—

**जगन्नाथ**—माझ्या शिक्षणाची काळजी आतां राहिली नव्हती.

**बायजा**—म्हणजे ?

**जगन्नाथ**—माझ्या शिक्षणाची व्यवस्था होऊन मी दरमहा तुम्हांला पंधरा रुपये पाठवले असते. घर गेलं असतं तरी पोट कसंबसं भरलं असतं. आई, हें काय केलंत तुम्हीं ?

**बायजा**—एका क्षणाची चुकामुक झाली. जगू, तूं आधीं कां आला नाहींस ?

**जगन्नाथ**—तूं कां नव्हतीस इथं ? गमतीगमतीनं तुला आधींच सांगायचं म्हणून एवढा वेळ वाट पाहिली. तूं सकाळींच बाहेर गेली होतीस म्हणून शोधायला गेलों. तूं कुठं होतीस ?

**बायजा**—मंजुळाबाईकडे गेलें होतें. त्यानीं मला बसवून घेतलं. नवऱ्याच्या त्रासाचं चऱ्हाट वळीत त्या इथपर्यंत आल्या. मला वाटलं होतं, त्यांच्या शद्बानं कांहीं उपयोग होईल. पण पाहिली ती सारी उलटीच स्थिती !—

**जगन्नाथ**—पांच मिनिटांच्या चुकामुकीनं केवढा घात झाला हा ! आई, मी गुलाम झालों.

**बायजा**—दैवानं गळा कापला. ज्यांच्या कपाळीं दैन्य त्यांनीं सोनं हातीं घेतलं तरी अशी माती होत असते. जगू-बाळ,-त्यांना दोष देऊं नकोस. त्यांना टाकून बोलूं नकोस. त्यांनीं केलं तें तुझ्यासाठीं म्हणून केलं हातीं फूल घेतलं

त्याचा खंजीर झाला. दैवाला दोष दे पण त्यांना बोल लावूं नकोस.

**जगन्नाथ**—जा, आतां भाकर घेऊन ये. आज तुझ्या हातचा शेवटचा चतकोर तोंडीं घालतों. स्वातंत्र्याचा आजचा शेवटचा घांस वर्षभऱ्याच्या गुलामगिरीला पुरतो कीं काय, तें आतां पाहिलं पाहिजे. रडूं नकोस. जा. भाकर आण. (बायजा जाते.) आजच एवढा एक स्वातंत्र्याचा दिवस. उद्यांपासून माणुसकीला मुकवणारी गुलामगिरी.

( भीमपलास--झपताल )

**रडवि मनुजा ही पाडी नियति मोहिं।**
**अभिमान घे दान आल्या कटु उपाधिं ॥ धृ ॥**
**पळत्या जगा हाणि गति हे नवीना।**
**उलटें पडे दान कुणि दावि करुणा ॥ १ ॥**

( तो क्षणभर स्तब्ध उभा राहतो. चिमणी येते. )

**चिमणी**—काय ? सांगितलं ?

**जगन्नाथ**—होय. सांगितलं.

**चिमणी**—मग हंसा ना—(तो हंसायचा प्रयत्न करतो) हें कसलं मेलं रडवं हसणं.! चांगलं तोंड भरून हंसावं—आई काय म्हणाल्या ? बाबांना सांगितलं का ?

**जगन्नाथ**—बाबांचं डोकं दुखतं आहे. मी यायच्या पूर्वींच ते आंत जाऊन आडवे झाले.

**चिमणी**—म्हणून का हें असं रडवं तोंड ? आई काय म्हणाल्या ?

**जगन्नाथ**—आई काय म्हणाली ?

**चिमणी**—हें माझ्या प्रश्नाचं उत्तर वाटतं ? याचा अर्थ काय समजावा बाई !

**जगन्नाथ**—याचा अर्थ अनर्थ !

**चिमणी**—एवढं होऊनही अनर्थ ? हो-घर राखणं कठीणच जाणार.

**जगन्नाथ**—घर गेलं नाहीं-पण त्याहूनही प्यारी वस्तू हरवून बसलों.

**चिमणी**—त्याहूनही प्यारं ? घराहूनही प्यारं काय ? प्रेमाचं माणूस?

**जगन्नाथ**—त्याहूनही प्यारं—

**चिमणी**—त्याहूनही प्यारं म्हणजे हंसणं कीं रडणं ?

**जगन्नाथ**—तीं दोन्हीही गेलींच-पण त्याहूनही प्यारं असं माझं--( बायजाबाई थाळी घेऊन येते. )

**बायजा**—कोण ? चिमणा ? ( हातची थाळी पडते. )

**जगन्नाथ**—हा पहा--तोंडचा घांस गेला. चिमणा-माझं सर्वस्व गेलं ! माझा जीव गेला. तूं पाहाते आहेस हें माझं प्रेत आहे.

**चिमणी**—काय बोलतां आहांत हें ? काय गेलं, सांगा ना ?

**जगन्नाथ**—माझं स्वातंत्र्य—( केंस ओढून ) चिमणा-माझ्या प्राणा—( किंचाळून ) मी गुलाम झालों—मी गुलाम झालों—

( पडदा )




**जगन्नाथ**--माझें सर्वस्व गेलं ! अंक १, प्र. ३.

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला

( रघोजीरावाचा दिवाणखाना. एका इझीचेअरवर जगन्नाथ निजला आहे. रघोजी व यादवराव येतात )

**रघोजी**—( इकडे तिकडे पाहून खुंटीवरची बंदुक खांद्यावर टाकून जावयास निघतो. इतक्यांत त्याची नजर खुर्चीवर निजलेल्या जगन्नाथकडे जाते.) सूवरका बच्चा अझून निजून राहिला आहे ! शरम नाहीं वाटत ? मी न्याहारी उरकूनसुद्धां शिकारीला जायला निघालों आणि याच्या अझून झोंपा चालल्या आहेत. बाजीरावाचा बेटाच जसा कांहीं. पाहिलंत यादवराव, हा माजोरीपणा पहा आणि मग मला दोष द्या. एवढा वेळ ओरडतों आहे पण दाद देत नाहीं हरामखोर !

**यादवराव**—जगन्नाथ--जगन्नाथ--उठ--उठ--जागा हो.

**रघोजी**—पहा-आतां तुम्हींच पहा. अझून उठत नाहीं. जसा कांहीं सारी रात्र तरवार मारीत बसला होता. जग्या--जग्या, उठतोस कीं नाहीं हरामखोरा.

**जगन्नाथ**—( उठून ताडकन् उभा रहातो ) कुणाला म्हटलंत हरामखोर ?

**रघोजी**—पाहिलंस ? नुसतं ढोंग केलं होतं झोपेचं. चांगला जागा होता. नुसती घुरघुशी मारून निजला होता, काम चुकवण्यासाठीं. अशी झोपेचीं सोंगं घेऊन कामं चुकवतां येत नसतात.

**जगन्नाथ**—हरामखोर कुणाला म्हटलंत ?

**रघोजी**—तुला एवढा वेळ निजून राहून काम चुकवायचा प्रयत्न करायचा आणि 'हरामखोर' म्हटलं म्हणजे उसळून यायचं ! कशाला हें कांगाव दाखवतोस मला ?

**जगन्नाथ**—काल सारा दिवस शेतावर खपत होतों. घटकाभर झोंप जास्त लागली. अझून शेतावर जायला चांगला घंटाभर अवकाश आहे.

**रघोजी**—लवकर गेलास उठून शेतावर तर काय बाप मरेल तुझा ?

**जगन्नाथ**—जीभ आवरून बोला.

**रघोजी**—कुणाला सांगतोस जीभ आवरायला. मी तुझा मालक आहें-तूं गुलाम

आहेस माझा. कान पिळून आठवण देऊं का- कीं वर एक पागोटं पाहिजे कानपिळणीचं ?

**जगन्नाथ**—मीं तुमचा गुलाम आहें हें केव्हांही विसरणार नाहीं. एवढी काळजाला घरें पाडण्याजोगी गोष्ट मी कसा विसरेन ? पण कानपिळणी आणि थोबाडीत देणं मात्र विसरा.

**यादवराव**—जगन्नाथ, जा पाहूं आपल्या कामाला. उगीच त्यांचा राग कां वाढवतोस ?

**रघोजी**—काय करशील रे ? उलट हात टाकशील ? माझ्या देशील कां थोबाडींत एक ? हात पोंचेल का माझ्या थोबाडापर्यंत ? विसरा म्हणे विसरा ! काय विसरा ? तुला गहाण टाकला आहे हें विसरा ? कीं तुझा बाप हरामखोर झाला हें विसरा ?

**जगन्नाथ**—माझा बाप हरामखोर असता तर तुमच्या दारचे तुकडे चघळण्यासाठीं मीं कशाला इथं आलो असतों ? मी तुमचा नोकर आहें. माझ्याकडून चोख नोकरी करून घ्या. जादा बात बोलायचं काम नाहीं.

**रघोजी**—जात भडभुंज्याची आणि मिजास बादशाहाची !

**जगन्नाथ**—मीं तुमच्याच जातीचा आहें. अस्सल मराठ्याचा बच्चा आहे.

**रघोजी**—मराठ्याच्या बच्चाचं तोंड तर पाहा ! मुडदेमहाल सूरत कशी खुलली आहे पाहा !

**यादवराव**—चला रघोजीराव, शिकारीला जायचं आहे ना आपल्याला ? उन्ह यायला लागलं.

**रघोजी**—लहानू-

**लहानू**—( प्रवेश करून ) जी धनीसाब-

**रघोजी**—घरांत सांग, याला न्याहारी-बिहारी काहीं द्यायची नाहीं. उपाशी पाटवला पाहिजे कामावर.

**लहानू**—अन् थत भुकेनं कळवाळला तर ?

**रघोजी**—तर माती खाईल शेंतातली. भुकेनं कळवळतो म्हणे. जा जाऊन

आंत सांग. ( लहानू जातो )

**जगन्नाथ**—न्याहारी केल्याशिवाय मी जाणार नाहीं

**रघोजी**—जाणार नाहीं म्हणजे काय ? गेलं पाहिजे. माझा हुकूम आहे.

**जगन्नाथ**—उपाशीं राहाण्याचा हुकूम ? धन्यानं असला हुकूम करूं नये आणि नोकरानं तो पाळूं नये.

**रघोजी**—धनी-चाकराचे कायदे मला तूं शिकवणार ? कधीं धनीपणा करून पाहिला होतास ? धन्याची जबाबदारी तुला काय माहित आहे ?

**जगन्नाथ**—मला माहित आहे तेवढं कळायला तुम्हांला तीन जन्म घ्यावे लागतील.

**रघोजी**—माझे जन्म काढतोस ? हरामखोर पाजी-गुलाम तो गुलाम आणि वर दिमाख पहा !

**जगन्नाथ**—पोटाला घाला आणि नोकरी करून घ्या- जास्त बोलायचं कारण नाहीं

**रघोजी**—मला तंबी देतोस ? लंगडं तें लंगडं आणि गांवदरीला चरेना. असा नाहीं ताळ्यावर यायचास. लहानू ( लहानू येतो ) माझा हंटर आण.

**लहानू**—हंटर कशापायीं जी ? मी काय केलंयाजी धनीसाब ?

**रघोजी**—फटके खाणारा काय तूं एकटाच आहेस. हा पाहा हरामखोर कसा डोळे वटारतो आहे माझ्यावर. जा-आधीं माझा हंटर आण. (लहानू जातो)

**यादवराव**—जाऊंद्या रघोजीराव. पोर आहे, मूर्ख आहे पहिलीच चूक आहे. क्षमा करा झालं.

**जगन्नाथ**—मी पुन: सांगतों. माझी चूक नाहीं. शेतावर जायला अजून अवकाश आहे. न्याहारी केल्याबरोबर योग्य वेळीं शेतावर जाईन.

**रघोजी**—मी पुन: सांगतों कीं तुला न्याहारी मिळणार नाहीं.

**मंजुळा**—(प्रवेश करून) आणि मी सांगतें, कीं मी त्याला न्याहारी देणार. न्याहारी केल्याशिवाय बिचाऱ्या मुलाला शेतावर पाठवण्याइतके तुम्हीं कसाब झालांत, पण माझ्यानं नाहीं ऐकवणार असले हुकूम.

**रघोजी**—आमच्या कारभारांत तोंड घालायला तुला कुणी सांगितलं आहे ? लहानू, हंटर आण.

**लहानू**—( प्रवेश करून ) हा आणल्या. पुन धनीसाबांनी सोता मारायची तसदी घ्याया नग. एक दिस मी बघतों की वाइच हंटर चालवूनशान.

**रघोजी**—आण इकडे. जग्या असा पुढं उभा रहा.

**जगन्नाथ**—धनी साहेब, मी तुमचा नोकर झालों आहें तो तुमचं काम करण्यासाठीं–मार खाण्यासाठीं नव्हे, गुलाम झालों म्हणून माझी माणुसकी कांहीं गेली नाहीं जनावरासारखा माझ्या अंगावर हात टाकाल तर त्याचे परिणाम फार वाईट होतील.

**रघोजी**—काय करशील रे ? काय करशील–

**मंजुळा**—( आड येऊन ) तो काय करणार तें करो पण मी सांगतें, मी इथं उभी आहें तोंपर्यंत जगूच्या अंगाला हात लावू द्यायची नाहीं. हें पक्कं ध्यानांत ठेवा.

**यादवराव**—खरं आहे. शाबास !

**रघोजी**—काय खरं आहे ! ऐकलंस ? तूं आधीं घरांत जा. हे परके पुरुष इथं उभे आहेत. गोषा सोडून यायला तुला कुणी सांगितलं होतं ?

**मंजुळा**— आग लावा तुमच्या गोषाला. सोन्यासारखा मुलगा–त्याच्या आंगावर हात टाकायला असे उठलांत आणि गोषाचा बडिवार धरून जर मी उगी राहिलें तर माझ्या जातीला बट्टा लागेल. पुनः सांगतें, खबरदार त्याच्या आंगाला हात लावाल तर !

**रघोजी**—असं माझं घर फोडतो आहेस अं ? नवराबायकोंत वांकडं आणून स्वतः मजा मारायचा विचार आहे वाटतं ?

**जगन्नाथ**— हं खबरदार ! बायकांच्या अब्रूविषयीं हलक्या जिभेनं बोलणाऱ्या हलकटाची जीभ उखडून काढीन.

**रघोजी**—दिमाख पहा पोराचा. दाढेंत मावत नाहीं सजगुरा आणि विसार घेतो हत्तीच्या घांसाचा ! कुणाची जीभ उखडणार आहेस रे ! पुनः म्हणतों–ही

अवदसा तुझ्या पडपानं जी इतकी धांवत गोषा सोडून आली आहे ती तिची तुझ्यावर —

**जगन्नाथ**—( रागानें फणफणत ) हं-धनीसाहेब—तोंड आटोपा—तोंड आटोपा—चवताळलेल्या चित्त्याला असा डिवचू नका !

**रघोजी** – आतां या चवताळलेल्या चित्त्याचा ढाण्या वाघ करतों पहा. घे-बक्षिस-घे-( चाबूक लगावतो. जगन्नाथ रागानें थरथर कांपूं लागतो आणि वळवळणारे हात दाबून ठेवण्याचा प्रयत्न करतो. यादवराव व मंजुळा दोन्हीं हाताला दोन बाजूंनीं धरतात. मंजुळा या धांदलींत हळुच यादवरावाला "आतां बाहेर जाऊं नका" म्हणून सांगते. )

**यादवराव**—हा काय अविचार रघोजीराव ? हें पोर तें केवढं ! तुमच्या सारखीं मोठीं माणसं जर असल्या कोवळ्या पोरावर हात टाकूं लागलीं तर प्राण जायचा एकादे वेळीं.

**रघोजी**—प्राण जायचा कां ? चाबकाखालीं फोडून काढून प्राणच घेतों पहा.

**जगन्नाथ**—प्राण घेण्याच्या बाता कशाला ? पुन: एक फटका तर येऊंदे —त्या तुमच्याच बंदुकीनं तुमचाच खून नाहीं पाडला तर मराठ्याच्या बीजा-चाच नव्हे !

**यादवराव**—चला रघोजीराव. झाली एवढी शिक्षा पुरे झाली.

**रघोजी**—आधीं शेतावर जा. न्याहारी न घेतां गेलं पाहिजे. तरच इथून हालेन-नाहींतर अस्सा राहीन हंटर फडकावित. चलाव—निकालो अबीके अबी !

**मंजुळा**—उपाशीं पोटीं पोराला मी मुळींच बाहेर जाऊं देणार नाहीं. ( आंत जाते )

**रघोजी**—मोठी आली आहे दयेची पुतळी मला शिकवायला.

**लहानू**—हंटर ठिवु का आंत न्हेवुनशान ?

**रघोजी**—जा ठेव. कसा उभा राहिला आहे बेरड पहा. तोंडातून शद्ब तरी निघतो आहे का ?

**जगन्नाथ**—न्याहारी केल्याशिवाय मी प्राण गेला तरी शेतावर जाणार नाहीं.

**रघोजी**—या घटकेला तुला माझ्या घराच्या छपराखालीं एक घांसही खाऊं देणार नाहीं.

**मंजुळा**—( शिदोरी बांधून घेऊन प्रवेश करून ) तर मग ही भाकर खा शेतावर जाऊन—आणि मग लाग कामाला.

**रघोजी**—मस्तवाल बायको. माझा पाणउतारा करते. जा--जा म्हणातें घराबाहेर खा. पण या घरांत खाशील तर जीव घेईन.

**यादवराव**—चला आतां बाहेर. किती वेळ झाला पहा. माझं ऐका. तिकडे पाहूंच नका. ( त्याला घेऊन जातो )

**जगन्नाथ**—बाईसाहेब, कोणत्या शद्बांनीं तुमचे आभार मानूं. आज आईची जागा तुम्हीं राखलीत. परक्या घरीं आलों पण इथंही मला एक आई आहे, एवढा धीर मनाला आला

**मंजुळा**—कसली मी आई ? जसा तुझा तसाच माझा छळ चालला आहे हें तूं पाहातोच आहेस. दोन दु:खी माणसं एका जागीं आलीं म्हणजे एकामेकांबद्दल दया दाखवतात एवढंच तसंच माझं घरधनिणीचं काम मला नको का बजवायला ? जा आतां. पुन्हां यायचे कदाचित आणि पुन: भलत्या कुशंका काढित बसायचे. ( जगन्नाथ मुकाट्यानें शिदोरी घेऊन जातो आणि यादवराव येतो. ) आलांत ? मी भीत होतें, तुमची सुटका होते कीं नाहीं त्या खविसाच्या तावडींतून म्हणून.

**यादवराव**—आलों कसला ? नुसता निसटलों. पुन: तो सैतान मागोमाग येईल कीं काय या भीतींत आहें. तूं घरांत जा पाहूं आधीं. ( मंजुळा जाते. यादवराव पाकीट काढून त्यांतले कॅटलॉग उलथे पालथे करतो आणि नोटपेपर काढून फाउन्टन पेन सरसावून लिहिण्याची तयारी करतो. इतक्यांत रघोजीराव येतो. )

**रघोजी**—चांगलीच झुकांडी दिलीत की ! तुम्हीं बरोबरच आहांत असं समजून मी त्या सद्बाबरोबर बोलत उभा राहिलों. मागं वळून पाहातों तों तुम्हीं नापत्ता. मागं पुढं पाहिलं आणि पुन: घरीं आलों.

**यादवराव**—मी घरीं जातों असं म्हटलं, तें तुम्हीं ऐकलं नाहीं वाटतं. अगदीं बोलण्याच्या रंगांत होतां तुम्हीं आणि मला रिपोर्टाची आठवण झाली. कालच

रिपोर्ट गेला पाहिजे होता पण राहिलाच कसा बेटा चुकून. आतां दिल्लीची कमिटी माझे वाभाडे काढील. तिथं सारा रिपोर्टाशीं व्यवहार आहे. कितीही काम झालेलं असो किंवा नसो, पण रिपोर्ट पाहिजे.

**रघोजी**—ही आजची हकिकत घालून या त्या रिपोर्टांत. आणि या पोरानं मला खून करण्याची कशी धमकी दिली तेंही लिहा. असल्या या पोरांचा हा उर्मटपणा चव्हाट्यावर आणल्याशिवाय त्यांना अद्दल बसायची नाहीं.

**यादवराव**—त्याची काळजी नको. अशा चुगचुगीत रिपोर्ट लिहितों कीं यंव्! नक्कल दाखवतोंच तुम्हांला संध्याकाळीं माफ करा अं! तुमची निराशा झाली असेल तेंही खरंच आहे. बरोबर कोणी असल्याखेरीज शिकारीला मजा येत नाहीं.

**रघोजी**—तसं कांहीं नाहीं. मला एकट्यानं शिकारीला जायची संवय आहे. पण तुम्हीं बरोबर असतां म्हणजे तेवढीच थोडी मजा आली असती. असं पहा, तुम्हीं जेवणं उरकून घ्या. मला यायला संध्याकाळ होईल कदाचित् माझी वाट पाहूं नका. रामराम ( जातो )

**मंजुळा**—( प्रवेश करून ) गेली वाटतं स्वारी? आतां संध्याकाळपर्यंतची निश्चिन्ती झाली.

**यादवराव**—तें कुणी सांगावं? म्हाताऱ्याची मधेंच लहर फिरायची कदाचित्

**मंजुळा**—हो–तेंही कांहीं अशक्य नाहीं. आतां तुम्हींच सांगा, अशा या आयुष्यांत माणसाच्या जिवाला सुख कसं मिळेल?

**यादवराव**—मंजुळाबाई, तुमची ही स्थिती पाहून माझा जीव तिळतिळ तुटतो. ब्रह्मदेवाच्या मूर्खपणाची कींव येते. असलं नाजूक फूल तसल्या त्या दगडावर वाहून जावं, यासारखा दैवदुर्विलसिताचा दुसरा दाखला कोणता? सारं हिंदुस्थान मी पालथं घातलं आहे; जिकडे पहावं तिकडे ही अशीं विजोड जोडपीं. हे असले प्रकार पाहिल्यामुळंच मला लग्नाचा तिटकारा आला आणि अजूनपर्यंत मी त्या खोट्या बंधनांत पडण्याचं धाडस केलं नाहीं.

**मंजुळा**—म्हातारे नवरे आपल्या बायकोला तळहाताच्या फोडासारखी

ठेवतात, असं म्हणणं आहे. पण इथं पहावं तो आपली उलटच परी. अशा छळ· छळून तीन बायका मारल्या हो यांनीं आणि आतां माझ्या जिवावर उठले आहेत.

**यादवराव**—तुमची स्थिती पाहून मला तुमची कींव येते. पण किती झालं तरी मी परका. काय माझा संबंध बोलण्याचा ?

**मंजुळा**—असं म्हणून कसं होणार ? माझी तुम्हांला कींव येते ना ? मग माझ्यासाठीं तुम्हीं काय करणार आहांत ?

**यादवराव**—माझ्या जागीं दुसरा कुणी असता तर त्यानं 'काय माझा संबंध ?' असं पट्कन् उत्तर दिलं असतं. पण मी—काय सांगूं ?—मला कांहीं बोलतां येत नाहीं. दुर्दैवाच्या तापानं तुमच्या यौवनाची कळी कोमेजून जाते आहे, हें पाहून माझ्या काळजाचं पाणी पाणी होतं आहे.

**मंजुळा**—त्या पाण्याचा ओलावा माझ्या तापलेल्या जिवाला थंड करील का ?

**यादवराव**—मंजुळाबाई, हें माझं हृदय तुमच्यासमोर कसं उघडं करून दाखवूं ?

**मंजुळा**—अगदीं संकोच धरूं नका. जें कांहीं तुमच्या मनांत असेल तें उघड उघड बोलून टाका. ऐकण्याची माझी तयारी आहे.

**यादवराव**—मंजुळाबाई, मी इथं आलों—तुमच्याकडे राहिलों. पाहुण्याच्या नात्यानं वागत आलों-पण जसजसा तुमचा छळ माझ्या नजरेला येऊं लागला तसतशी तुमच्याबद्दल सहानुभूति उत्पन्न होऊं लागली. सहानुभूतीमुळें दयेचा प्रादुर्भाव झाला आणि दयेचं—क्षमा करा—मी स्पष्ट बोलणार आहें—आणि दयेचं प्रेमांत रूपांतर होऊं लागलं.

**मंजुळा**—प्रेमांत रूपांतर होऊं लागलं ?

**यादवराव**—होय-प्रेमांत रूपांतर होऊं लागलं. आतां चोरून किती दिवस ठेवूं ? या खेडयांतल्या पाहणीचं माझं काम बहुतेक संपलं आहे. आतां हें गांव मला लवकरच सोडलं पाहिजे. जाण्यापूर्वीं तुमच्याकडे हृदय उघडं करून टाकावं म्हणून मनाला वाटत असे. पण धीर होत नसे. आज तुम्हीं मला उत्तेजन दिलं—बंदिवान जिव्हा त्यामुळंच मोकळी झाली.

**मंजुळा**—माझं मन कसं बावरून गेलं आहे.

**यादवराव**—असं बावरून कसं चालेल ? मन निधडं केलं पाहिजे. भेकड हृदयांतून विजयाची प्रतिष्ठा होत नसते. किती दिवस आतां खितपत राहाणार ? अफाट जग पसरलं आहे—त्या जगांत सौख्याच्या साधनांची रेलचेल उडाली आहे. रेशमी साडी तुम्हीं नेसलांत तर या खेड्यांत ती पाहायलासुद्धां माणसं नाहींत. सुंदर फुलांची वेणी या तुमच्या रेशमी केशकलापावर टेऊन दिलीत तर प्रेमाच्या श्वासानं तिचं अवघ्राण करणारा जीव तुमच्याजवळ नाहीं. यौवनाच्या बहरानं तुम्हीं फुलून निघालां आहांत—पण प्रेमी जीवाचा कोमल करपाश न मिळतां जख्खड म्हाताऱ्याच्या हाडाच्या सांपळ्याशीं तुम्हांला जुलमानं लूट करावी लागत आहे. प्रेमी जीवा, हें दुर्दैव तुला डांचत नाहीं का ?

**मंजुळा**—नका हो असं कांहीं बोलूं ! तुमचं हें गोड भाषण ऐकलं कीं असं वाटतं–

**यादवराव**—थांबलांत कां ? बोला ना. काय वाटतं ?

**मंजुळा**—काय वाटतं तें सांगतां येत नाहीं. जिवाचा त्रास असह्य होतो—जाचांची आठवण जाळूं लागते—मनाचं समाधान मिळवण्यासाठीं पापाच्या खाईंत उडी घ्यावी असं वाटूं लागतं—

**यादवराव**—पापाच्या खाईंत कां म्हणतेस ? प्रेम म्हणजे पाप काय ?

**मंजुळा**—प्रेम म्हणजे काय हो ? मला प्रेम अजून माहीत नाहीं. प्रेमाच्या गोष्टी मी पूर्वीं ऐकल्या होत्या. लग्न झालं तेव्हां प्रेम मला मिळेल म्हणून किती किती वाटलं होतं, पण प्रेम म्हणजे कहाणींतली कथाच राहिली. प्रेमाचा शब्द-सुद्धां जिथं ऐकूं येत नाहीं तिथं प्रेमाचा अनुभव कुठला मिळायला ? प्रेम म्हणजे मला प्रश्नचिन्ह झालं.

(**खमाज**-ठुंबरी)

**वाहिं सदा मन पतीला । मतीला ना जागा**
**सतीला ॥ धृ ॥ प्रेमपिपासा नुरलि मिरवाया ।**
**रमाया प्रेमाच्या रतीला ॥ १ ॥**

**यादवराव**—अरेरे ! काय हें दुर्दैव ! चांडाळ विधात्या, असल्या या प्रेमी जीवाला वार्धक्याच्या गुलामगिरीशीं जखडून टाकण्यांत तुला काय गोड वाटलं ?

**मंजुळा**—ही असली भाषा मला कळत नाहीं हो. या खेडयांत राहून मी अगदी खेडवळ झालें आहें. पूर्वी मी चांगली शिकली सवरलेली होतें पण इथं आल्यापासून सगळं कांहीं विसरून गेलें. यांनाच जिथं लिहिण्यावाचण्याचं अपथ्य तिथं मला बायकोमाणसाला वाचायला कुठून काय मिळणार ?

**यादवराव**—प्रेमाचं पुस्तक वाचायला अक्षरांची ओळख नसली तरी चालते.

**मंजुळा**—पण आहे कुठं तें पुस्तक ?

**यादवराव**—तें पुस्तक ह्या हृदयांत आहे. या हृदयाशीं आपलं हृदय मिळीव, कीं अक्षरान् अक्षरावर खाडकन् प्रकाश पडेल. ये-ये अशी संकोच धरूं नकोस.

**मंजुळा**—काय करूं हो ? काय करूं ? एक मन म्हणतं असं-आणि दुसरीकडून कुणी असं जोरानं खेंचतं आहे मागं !

**यादवराव**—आतां विचार करूं नकोस. विचारानं सुख दुरावतं. सुखाचा क्षण अमोल असतो आणि घडयाळाच्या कांटयाप्रमाणं तो सारखा पुढं पाऊल टाकित असतो. ये-विचार करूं नकोस. आल्या सुखाला घट्ट कवटाळून ठेव, प्रेमाचा हात आज पुढं येतो आहे त्याचा स्वीकार कर. उद्यां मी इथून गेलों, कीं ही संधी गमावून बसशील

**मंजुळा**—उद्यां गेलांत तर ?—नका हो मला टाकून जाऊं.

**यादवराव**—तूं माझी झाल्याशिवाय टाकून जाण्याची कल्पना मला दुःसह कशी होईल ? या हृदयाचा आश्रय कर, कीं मी तुला केव्हांही अंतर देणार नाहीं.

**मंजुळा**—खरोखर ?—ईश्वरसाक्ष ?

**यादवराव**—अगदीं ईश्वरसाक्ष—अगदीं तुझ्या गळ्याशपथ !

**मंजुळा**—माझ्या गळ्याला हात लावलात ?

**यादवराव**—होय, शपथेसाठीं म्हणून हात लागला पण तो आतां जन्माचा कायम होऊन गेला पाहिजे. ये, भोळ्या जिवा, ये. अशी विचार करूं नकोस.

**मंजुळा**—ईश्वर साक्ष तुह्मीं माझा विश्वासघात करणार नाहीं ?




जगन्नाथ—लाथ मारली असती एक कंबरड्यांत ! अंक २, प्र. १

**यादवराव**—नाहीं-नाहीं- नाहीं

**मंजुळा**—तर मग—( मंजुळा त्याला भेटावयास जाते, इतक्यांत जगन्नाथ येऊन दोघांमध्यें उभा रहातो )

**जगन्नाथ**—हरामखोर !- ( यादवराव मटकन खालीं बसतो ) लाथ मारली असती एक कंबरड्यांत. पण अतिथी आहेस-पाहुणा आहेस म्हणून गय करतों. ज्यानं तुला आश्रय दिला त्याच्या गैरहजिरींत त्याच्या घरावर असा दरोडा घालतोस ? बेशरम-कृतघ्न—! जगानं डोळे मिटले म्हणून देव कांहीं मेला नाहीं ! आणि तुम्हीं—कोणत्या शब्दानीं तुम्हांला बोलूं ? आईप्रमाणं मला अन्न दिलंत आणि बाईसाहेब, हें काय मला पाहायला लावलंत ? (ती रडूं लागते) अरे ए मांगा, ऊठ, इथून माझ्या नजरेसमोरून दूर हो. नाहींतर हंटरचा प्रसाद तुलाही चाखायला मिळेल ( तो घाबरत बाहेर जातो. )

**मंजुळा**—क्षमा कर—जगू-मला क्षमा कर. मी चुकत होतें. तूं माझा पाठी-राखा झालास. पापाच्या कड्यावरून मला मागं ओढलंस. नाहींतर आज मी नरकाच्या तळाला जाऊन पडणार होतें.

**जगन्नाथ**—मी पोर आहें तुमचं. तुहांला उपदेश काय करूं ? पण आतां झालं तें होऊन गेलं. यापुढं तरी असा अविचार करूं नका. माझी काळजी करूं नका. माझ्या तोंडून एक अक्षरही बाहेर फुटणार नाहीं.

**मंजुळा**—जगू-भाऊराया-बाळा--मला क्षमा कर. क्षमा केली असं तूं प्रत्य-क्ष तोडानं म्हणेपर्यंत मी इथून हालणार नाहीं. तूं क्षमा केलीस म्हणजे देवानंच मला क्षमा केली असं मी समजेन. देवासारखा धांवून आलास—

**जगन्नाथ**—देवानंच मला पाठवलं खरं. कुदळ-फावडं कसा विसरून गेलों त्यावेळीं, हें आतां कळलं. हा देवाचाच हात. बाईसाहेब, देवाचा हात सदा आप-ल्या शेजारीं असतो हें विसरूं नका.

( **देस**--एकताल )

**पाहिला देवसखा सजला । तोचि एक**
**मात्र निकट राहिला ॥ धृ ॥ दे शरणा**

**दीनजना आप्तकामभावना। देवपणा**
**नाहिं उणा राहे अनुगत जरि जनिं**
**तया दयामया सतत ॥ १ ॥**

जाऊं मी आतां ?

**मंजुळा**—पण एकदां ' क्षमा केली ' असं म्हण पाहूं.

**जगन्नाथ**—क्षमा केली--ईश्वरानं तुला क्षमा केली. बाईसाहेब—आई ह्या लेंकराची अब्रू तुझ्या हातीं आहे, हें ध्यानांत ठेव. ( आंत जाऊन कुदळ-फावडं घेऊन येतो. ती त्याच्याकडे पाहात राहाते. ) जाऊं आतां ? ( जातो. ती पाहात राहाते. )

( पडदा पडतो )

---

## प्रवेश दुसरा.

[ गांवाजवळचा रस्ता-बाबाजी, बायजा, व लहानू प्रवेश करतात. ]

**बायजा**—चाबकानं मारलं ? हात तरी कसे वाहिले चाबूक उगारायला ! लहानू, तूं होतास ना तिथं ? कसा आड आला नाहींस ? हात नाहीं का धरलास त्यांचा ?

**लहानू**—मी व्हय ? थोत्तिच्या ! मलाच सांगत व्हते न्हवका माराया-पन म्यां शाप सांगितलं, आपुन असलं वंगाळ काम कधींबी न्हाई करनार म्हुन-शान. तवां धनिसाब मलाच माराया उठले.

**बाबाजी**—चांडाळ आहे तो ! दुसरी उपमाच नाहीं त्याला. ज्या दिवशीं कनोरनाम्यावर सही केली त्याच दिवशीं पोराचा गळा कापला. आतां कसली चौकशी करतेस ? चाबकाखालीं बडवलं किंवा लाथेखालीं तुडवलं त्या माझ्या एका सहीनं-रघोजीनं नव्हे—

**बायजा**—क्षणाची चुकामुक झाली. नाहींतर माझा बाळ या कसाबाच्या हातीं कशाला गेला असता ! लहानू, जेवायला तरी पोटभर घालतात ना ?

**लहानू**—घालत्याती. पन कोन ? धनीसाब ? तें न्हव त्येंचं काम. बाईसाब

एक माऊली हाय पघा. फकाफक वके पावतर देदेऊनशान वाढत्याती. धनीसाब सामोरे नसत्याती म्हुनशान तर आम्हीं पोटभर खाऊन ढिकरा येतों.

**बायजा**—एवढंच दु:खांत सुख. मंजुळाबाई तशी मायाळू आहे—

**लहानू**—हायती तर त्ये यादवराव आल्याती न्हवका-त्येंच्यावर त्येंची मायंदळ माया. जगू आल्यापून त्येच्याकड वांयच कलांडल्याती. पुन यादव-राव-लाख माणुस ! चिरिमिरी देत्याती कंदी कंदी—

**बाबाजी**—तुझ्या धनीसाहेबांची भेट होईल का रे आतां ?

**लहानू**—त्ये म्या कसं सांगू जी ? आल्याती तर येत्याल-न्हाईतर बंदुक घेऊनशान निसाटले कीं कुट मसनांत जात्याल त्येचा न्येम न्हाई—

**बायजा**—मी सांगितले त्यांना चार शब्द-जरा जगूसाठीं रदबदली केली-त्याला असा मारूं नका म्हणून म्हटलं-तर ऐकतील का रे ? कीं आपले अधिकच रागावतील ?

**लहानू**—असं पघा- कदाचित रागावत्याल—कदाचित न्हायबी रागावनार. पुन म्यां सांगतों--कीं आपलं इचारूं नये ह्येच बरं—( पडद्यांत—लहानू --अरे ए लहान्या )—आले कीं धनीसाब--आतां जीवच घेत्याल माजा-

**रघोजी**—( प्रवेश करून ) इथं गप्पा मारीत बसला आहेस ?

**लहानू**—बसलोंय कुठ ? उभाच हाय न्हवजी !

**रघोजी**—उभाच असलास तरीं गप्पा मारतो आहेस, यांत कांहीं शंका नाहीं काय बाबाजीराव, रामरामदेखील करावासा वाटत नाहीं अं ? अगदीं महार-धेडाच्या यादींत काढलंत आम्हांला ?

**बाबाजी**—रामराम करायचे परक्यांना. तुम्हीं काय तसे आहांत थोडेच. शिवाय जगू आतां तुमच्या घरीं आहे—

**रघोजी**—म्हणूनच रामराम करायला हवा ! हें वरिष्ठकनिष्ठांचं नातं आहे.

**बाबाजी**—मी काय बोलणार तुमच्या पुढं ? वरिष्ठ कनिष्ठाच्या गोष्टी तुमच्या पोराबाळांसाठीं—

**रघोजी**—म्हणजे मला पोरबाळ नाहीं म्हणून हिणवतोस ? काय पोरं घेऊन

करायचीं आहेत ? दुसऱ्याच्या घरीं गुलामासारखीं राबायलाच ना ?

**बायजा**—तुमच्या मुलांचं भाग्य कांहीं तसं नाहीं व्हायचं. त्यांना कांहीं गुलामासारखं कुठं राबावं लागायचं नाहीं—

**रघोजी**—काय रे बाबाजी, मराठमोळ्याची कांहीं समक्षा राहिली नाहीं वाटतं तुझ्या घरांत ?

**बाबाजी**—नशिबानं मस्तकांत मोळा ठोकला, त्याचवेळीं मराठमोळा गेला नाहींसा होऊन ! ( बायजाबाईला ) ऐकलंस, रस्त्यांत बोलूं नये असं कुणाशीं-

**बायजा**—घरच्या माणसाशींदेखील कसला आला आहे मराठमोळा नी गोषा ?

**रघोजी**—अस्सं अस्सं ! परवांच मी खाटीक होतों-इतक्यांत घरचा माणूस झालों अं ? काय चमत्कार आहे ! ही बुद्धी आम्हां पुरुषांना नसते बरं बाबाजी. नातीं जोडण्यांत बायका मोठ्या हुषार ! बायका नातीं जोडायला लागल्या, कीं पुढं कांहीं कामगिरी आहे म्हणून खास समजावं-

**बायजा**—कामगिरी कसली ? रागाच्या वेळीं-दुःखाच्या वेळीं चुकून बरावाईट शब्द जातो एकादा, म्हणून तेवढाच का धरून बसायचं आहे ? पोटच्या पोराला रागानं 'मेल्या' म्हणतात म्हणून तो मरावा असं का कुणा आईबापांना वाटत असतं-

**रघोजी**—किती योग्य बोललांत. ओठीं राग आणि पोटीं प्रेम—अशीच आपली म्हण आहे. वडील माणसं लहानानां शिक्षा लावतात ती याच तत्त्वावर. कसं लहानू ?

**लहानू**—जी व्हय. वठात राग आला असला कीं पोटात पिरीत असायचीच !

**रघोजी**—पाहिलंत ? या बावळ्याला सुद्धां कळतं हें ! पण मोठ्या माणसानां कळत नाहीं. शहाण्यासुरत्यांना सुद्धां कळत नाहीं.

**बायजा**—शहाण्यासुरत्यांना सुद्धां जें कळत नाही, तें आम्हां खुळ्या भोळ्या बायकांना कुठून कळणार ? पण म्हटलं, आमचा जगू अगदीं-अगदीं लाडांत वाढलेला. तळहाताच्या फोडासारखा जपणुकीनं ठेवलेला. पोरवय आहे-चुक-

माक झाली तर जरा काणाडोळा करायचा.

**रघोजी**—काणाडोळा करायची कला माझ्यापेक्षां त्याच पोराला चांगली साधली आहे शिवाय आम्हीं एक गाढवपणा केला आहे कीं नाहीं? ती एक छबेली आणली आहे ना घरांत? आतां हा दुसरा गाढवपणा केला आणि हा तुमचा छबडा घरांत घातला. करतोच आहे कीं काणाडोळा—!

**बाबाजी**—काय बोलतां हें?

**बायजा**—एवढंसं कोवळं पोर—

**रघोजी**—अहो, हीं कोंवळीं पोरंच फार वाईट. इंग्रजी शिकलेलीं. प्रेमाच्या गोष्टी वाचतात कीं नाहीं! पोरांना इंग्रजी शिकवायचंच आधीं बंद केलं पाहिजे. इथुन तिथून साऱ्या प्रेमाच्या गोष्टी. कशीं पोरं चेकाळणार नाहींत? त्यांचे परिणाम भोगावे लागतात आमच्यासारख्यांना.

**बायजा**—माझा मुलगा कांहीं तसा नाहीं.

**रघोजी**—तसा नाहीं? दिसेल. डोळे उघडून पाहिलंत म्हणजे दिसेल. त्या नागू सुभेदाराच्या चिमणीला विचारा. पधरासोळा वर्षांची चिमुरडी पोर पण हा परसांत काम करीत असला, कीं तासाचेतास त्याच्याशीं चिवचिंवत असते, बापाचे डोळे फुटले आहेत. उद्यां पोरीला पंढरपुरला पाठवावी लागली म्हणजे समजेल.

**बायजा**—हर हर! काय बोलतां हें? जीभ तरी कशी मेली वाहाते असले शब्द उच्चारायला?

**रघोजी**—ही अक्कल यायला माझ्यासारख्या तीन बायका माराव्या लागतात. त्याचा अनुभव आला चांगला म्हणजे जीभ वाटेल तशी वाहूं लागते.

**बाबाजी**—चल-चल घरीं. काय बोलतेस त्या मांगाबरोबर. बोलून चालून वाघाच्या गुहेंत पोराला लोटलं आहे. आला तर आमचा, मेला तर त्याचं नशीब. ( बायजाबाईला ओढीत नेतो. )

**रघोजी**—लहानू असा समोर ये. ( लहानू कांपत कांपत हात जोडीत पुढें येऊं लागतो ) असा समोर ये हरामखोरा! बोल—चुगली केलीस कीं नाहीं?

**लहानू**—कसली चुगली जी ?

**रघोजी**—आणखीन् वर कसली म्हणून विचारतोस ? मी गाढव आहे असं वाटलं तुला ?

**लहानू**—आपुनच आतां म्हेंगालात न्हव का ?

**रघोजी**—कीं मी गाढव म्हणून? गाढवा, मी गाढव का ? आतां पहा कशा दुगाण्या झाडतों. तो हंटर आण इकडे. यांना जाऊन सांगितलीस कीं नाहीं आजची हकिकत ? बोल, चावकानं मारलं जगूला म्हणून सांगितलंस कीं नाहीं ? ( चाबूक मारतो )

**लहानू**—न्हाई-न्हाई-जी व्हय-न्हाई-व्हय—(फटक्यासरशीं रडूं लागतो, नागोजी व चिमणी प्रवेश करतात )

**नागोजी**—काय हें रघोजीराव ? भर रस्त्यांत नोकराला फटकावतां ?

**रघोजी**—तर काय खोलींत कोंडून फटके देऊं ? कुणाच्या बापाची भीती आहे मला ? माझ्या नोकराला मी वाटेल तिथं फटकावीन. कोण मला मना करणार आहे ?

**नागोजी**—भूतदया तुम्हांला मना करणार ! जनावरंसुद्धां असली वागणूक सहन करणार नाहींत. काय वाटतं तुम्हांला रघोजीराव ? खेड्यांतल्या माणसांना कायदे कळत नाहींत म्हणून ? ते अस्मानी सुलतानीचे दिवस गेले आतां. हल्लीं कायद्यानं राज्यं चालूं लागलीं आहेत. हें संस्थान असलं म्हणून काय झालं? संस्थानांत सुद्धां कायदे असतात. माणसांना गुरांसारखं वागवणं कुठल्याही कायद्याला मंजूर होणार नाहीं.

**रघोजी**—मला कायदा शिकवायच्यापूर्वी तुम्हींच आधीं आपलं घर संभाळा. पोरीला दिली आहे वाऱ्यावर सोडून आणि मला कायदे शिकवताहेत ! माझ्या नोकराचं मी वाटेल तें करीन. कुणी नको मला अक्कल शिकवायला. आधीं तुम्हींच जरा अक्कल घ्या आणि त्याबरोबरच एक चाबूक घ्या ह्या पोरीला ताळ्यावर आणायला—

**चिमणी**—चाबकानं पोरांना ताळ्यावर आणायचे ते दिवस विसरा आतां.

पोरींची जात म्हणजे कांही जनावरांची अवलाद नव्हे. हीं तुमची खेडेगांवचीं मेंढरं आणि तुम्हीं त्यांचे धनगर. खुशाल चाबकाचे घडे घेत देत बसा—

**रघोजी**—सुभेदार, तुझ्या पोरीला जरा तोंड आवरायला शिकीव. आपली परावी म्हणणार नाहीं. माझं पित्त खवळल तर सारीं समान दिसूं लागतात मला! फटकावून काढीन चाबकाखालीं. धनगर कुणाला म्हणतेस पोरटे—?

**चिमणी**—मेंढरं पाळणाऱ्या अक्कलशून्य'ला—

**रघोजी**—तुझं आवडत लाडकं मेंढरूंदेखील माझ्याच कुरणांत चरतं आहे हें विसरूं नकोस. तुझा सूड त्याच्यावर काढीन. चामडी लोंबवीन लोंकरीसकट.

**नागोजी**— रघोजीराव, देवाच्या दयेनं तुम्हांला वैभव मिळालं आहे. गरीब-गुरीबांवर उपकार करायची ही संधी आहे.

**रघोजी**—आजच कां हो तुम्हांला गरिबांचा एवढा कळवळा आला? यापूर्वी मला उपदेश करायची लहर कुठं आली नाहीं तुम्हांला ती! पहातों आहें, जो उठला तो त्या जग्याच्या कळवळ्यानं तडफडतो आहे! पण म्हणावं, ध्यानांत ठेवा, या रघोजीशीं गांठ आहे माझ्याकडे काय पैसे नव्हते-कीं गांवांत दुसरीं कुणीं पोरं मिळत नव्हतीं? त्याला माझ्या घरांत राबवतों आहें तो राबवण्यासाठीं नव्हे—कशासाठीं हें कळायला तुम्हांला एक वर्ष थांबलं पाहिजे हाडांचा पिंजरा करून जग्याचं चालतं बोलतं प्रेत जेव्हां बाबाजीच्या हातीं परत येईल, त्याच वेळीं कळेल माझा उद्देश. जा, रदबदलीच्या भानगडींत पडूं नका. या मंगलाचरणापुढं कसली पोथी येणार आहे हें मला चांगलं कळतं आहे. मला नको आहे ती पोथी ऐकायला! लहानू, चल हो पुढं! ( दोघे जातात )

**नागोजी**—झालं तुझं समाधान? बेरड आहे तो मांग!

**चिमणी**— तो मांग असेल-बेरड असेल-पण माझ्या मनाकडे कोण पाहाणार?

( **तिलक कामोद**--त्रिताल )

**वीर तरुण धनि माझा राजा। गरुड**
**गगनिंचा पडत पंजरीं ॥ धृ॥ किति**
**कुटिल काळ रचित जाल। जनिं**
**वनिं करित हाल। चुरडि चरणतलिं**
**सुमनमंजिरी ॥ १ ॥**

**नागोजी**—आतां तुझ्या माझ्या हातीं कांहीं म्हणतां कांहींही राहिलेलं नाहीं.

**चिमणी**—तर काय त्यानं या हालअपेष्टांत मरत राहावं ?

**जगन्नाथ**—( प्रवेश करून ) कोण म्हणतं मरत राहावं म्हणून ?

**नागोजी**—आड राहून ऐकत होतास वाटतं ?

**जगन्नाथ**—पुढं येऊन तरी काय उपयोग होता ? पण चिमणा, तुला एक सांगतों, माझ्याविषयीं अगदीं निर्धास्त रहा. या हाल अपेष्टांचं मला कांहींच वाटत नाहीं. सुखाच्या लाडांत मी दुबळा बनत चाललों होतों. मला बलवान करण्यासाठींच ईश्वरानं या हालअपेष्टा पाठविल्या आहेत. पहा, पूर्वींच्या पेक्षां माझी तब्बेत सुधारलेली नाहीं दिसत तुला ?

**चिमणी**—कदाचित सुधारलीही असेल. पण त्या आणि या चित्रांत केवढं अंतर—

**नागोजी**—वेडी आहेस पोरी. आम्हीं किती तरवारी गाजवल्या तरी आमची जात शेतकऱ्याची. तरवारीची जरूर लागली कीं नांगर घटकाभर बाजूला ठेवायचा—पुन्हां आपले नांगरे ते नांगरेच. आम्हीं नांगऱ्यानींच राज्यं कमावलीं होतीं. या भूमातेच्या सेवेसाठीं आम्हीं हातीं तरवार घेतों, तसाच नांगरही घेतों. नांगर चालवतांना आलेला मनगटाचा जोरच तरवार मारायला खरी मदत देत असतो.

**चिमणी**—मला यांतलं एक अक्षरसुद्धां कळलं नाहीं.

**जगन्नाथ**—मला मात्र यांतलं अक्षरान् अक्षर तंतोतंत पटलं.

**चिमणी**—अस्सं ? मोठं आश्चर्य आहे ! बाबांइतकं म्हातारपण आलेलं दिसतं तुम्हांला—

**जगन्नाथ**—खरं आहे--चिमणे, संकटं माणसाला अकालीं म्हातारपणा आणतात. ऐषआरामांत लोळणाऱ्या तुझ्यासारख्या कोवळ्या मुलीला गुलामाचं मन कसं अजमावतां येणार ?

**नागोजी**--आतां तुम्हीं वर्दळीवर येणार, आतां माझी इथं धडगत नाहीं. सारख्या वयाचीं तरुण माणसं एके जागीं आलीं, कीं म्हाताऱ्यांनीं बाजूला राहून आपली अब्रू बचावून घ्यावी असं म्हणतात, त्याच मार्गाला आम्हीं लागतों.

जगू, येतों बरं--रामराम—( जातो. )

**चिमणी**—हें काय बाबा, थांबा—मोही आलें ना !–आमचे बाबा फा शहाणे आहेत नाहीं ?

**जगन्नाथ**—एवढया शहाण्या मुलीचे बाबा कीं नाहींत ते ! शहाणे असायचेच-

**चिमणी**– आतां पाहा हं ! सारं कांहीं विसरून भांडायला लागेन.

**जगन्नाथ**—काय विसरणार ? ही माझी गुलामगिरी ? कशी विसरणार ! हीं हातांतलीं कुदळ फावडीं—हा हातापायांवरचा चिखल–हा समोर दिसत असूनही कसं विसरणार ?--चिमणा, ही कुदळ फेंकून देतां येईल--हा चिखल धुवून टाकतां येईल—पण दैवाला खिळलेल्या माझ्या गुलामगिरीला तूं काय करशील ?

( **बागेश्री**--एकताल )

**गुलामी हृदयगामी मला गृहममता**
**परिहरितां दे पशुता । मनुज कसला ! ॥ धृ ॥**
**विषाद झाला तुटलि प्रणयवीणा**
**सुखाला निरखितां । निकट दिसत**
**कवळित करिं मरणगति ॥ १ ॥**

हीं पहा - तुझ्या डोळयांतून टिपं आलीं ! कुठं गेला तुझा भांडकुदळपणा ? हें काय ? आतां अगदीं रडूंच लागलीस कीं ! ही पहा कुदळ फेंकून दिली -आतां फक्त या एका भांडकुदळीचाच समाचार घ्यायचा—

**चिमणी**—चला--अगदीं बोलूं नका ! माणुसकी म्हणून कांहीं असते कीं नाहीं ? तो कॉलेजांत जायच्या वेळचा थाट–आणि हें आतांचं सोंग–मास्तरनीं पाहिलं तर त्यांना ओळखतां तरी येइल का ?

**जगन्नाथ**—केव्हां तसं–केव्हां असं. हें पुरुषाचं भाग्य आहे. रडत बसण्यांत काय पुरुषार्थ आहे ? आणि यांत तरी वाईट वाटण्याजोगं एवढं काय आहे ? अग, आम्हीं बोलून चालून शेतकरी शिपाई. नांगराच्या फाळावर आमचा जन्म तर तरवारीच्या टोंकावर आमचं मरण ! मराठयाच्या बच्चानं काबाडकष्टाला भिऊन चालत नसतं--

**चिमणी**— कळतं बरं--मला सारं कळतं. पण मला मन आहे–अगदीं चांगल्या शहाण्यासुरत्या बायकोचं मन आहे. तें मन मला रडवतं--तें मन मला म्हणतं, तुम्हीं असे खोटया अभिमानाला बळी पडलां नसतां तर असा प्रसंगच आला नसता. बाबांनीं नसतं का घर सोडवलं? बाबांनी नसता का शाळेचा खर्च चालवला?

**जगन्नाथ**—मराठ्याच्या पोरी, मराठ्याच्या बच्चालाच का हें सांगते आहेस? आज मीं रघोजीचा गुलाम झालों आहें पण उजळ माथ्यानं जगांत वावरतों आहें. पण तूं म्हणतेस तसं झालं असतं तर मी तुझ्या बाबांचा--पर्यायानं तुझाच गुलाम झालों असतों. फटके मारून रघोजी मला माझ्या गुलामगिरीची आठवण देत असतो. देहाला त्याचे फटके बसतात पण मनाला चटका लागत नाहीं. तुझ्या बाबांनीं माझे लाड पुरवले असते–तूंही मला मोठया प्रेमानं कुरवाळलं असतंस, पण रघोजीच्या फटक्यापेक्षां त्या तुझ्या गोंडस हाताचं कुरवाळणं मला दु:सह झालं असतं. मी गुलाम होईन--मोठया आनंदानं होईन पण तो प्रेमाच गुलाम--पैशाचा नव्हे

**चिमणी**—त्यांत कसली गुलामगिरी–माझ्या बाबांचा आणि तुमच्या बाबांचा अगदीं लहानपणापासून ऋणानुबंध नाहीं का? भावानं भावाला मदत केली असंच नसतं का झालं?

**जगन्नाथ**—अशीं का चिकटवून नातीं लागतात?.

**चिमणी**—कां बरं!– (थांबून स्तब्ध राहाते)

**जगन्नाथ**—कां? थांबलीस कां? बोल ना, दोन घरचीं दोन मुलं नवराबायको होतात कीं नाहीं.? असंच तुझं म्हणणं? चिमणे, दोघे दोस्त पाठचे भाऊ ठरत नाहींत. भावाचं नातं म्हणजे नवराबायकोचं नातं नव्हे. दोस्ती म्हणजे प्रेम नव्हे, आणि नवराबायकोचं नातं म्हणजेही प्रेम नव्हे. प्रेमाच्या मिलाफानं दोन परकी माणसं नवराबायको होऊं शकतात पण नवराबायकोचं नातं असलं म्हणजे प्रेम असतंच असं नाहीं. येव्हां तुला तें कळायचं नाहीं. किती झालं तरी तूं अजून पोर आहेस.

**चिमणी**—आणि तुम्हीं मोठे बुड्ढे आजोबाच कीं नाहीं?




**जगन्नाथ**—अर्जुन तूं पोर आहेस.  अंक २ प्र २.

**जगन्नाथ**—चाबकाच्या तडाख्यानीं आज सकाळीच मी एकदम म्हातारा झालो. तोंपर्यंत मीही पोरच होतो. पण या चाबकाचा प्रभाव मोठा विलक्षण आहे.

**चिमणी**—म्हणजे ? त्या मांगानं तुम्हांला चाबकानं मारलं ?

**जगन्नाथ**—चाबकाखेरीज तो दुसऱ्या कशानंही मारीत नाहीं. चाबूक हें त्याचं आवडतं हत्यार आहे. जसा शंकराचा त्रिशूळ, विष्णूचं सुदर्शन, शिवाजी महाराजांची भवानी तरवार तसाच रघोजीरावाचा चाबूक. तो चाबूक आहे म्हणूनच लहानूसारखा मराठा वीर मांजर होऊन बसला आहे. तो चाबूक आहे म्हणूनच मंजुळाबाईसारखी स्वतंत्र बायको परतंत्र होऊन राहिली आहे; तो चाबूक आहे म्हणूनच हा मर्द जगन्नाथ गुलामगिरीचं जोखड मानेवर घेऊन आनंदानं त्याच्या शेतांत राबतो आहे. मग आतां तूंच सांग, कीं चाबकाखेरीज दुसऱ्या कोणत्या हत्यारानं त्यानं मला मारावं ?

**चिमणी**—चाबकानं मारलं ? आणि तुम्हीं तें सहन केलं ?

**जगन्नाथ**—चिमणे, मी गुलाम आहें. तिनशें रुपयांच्या फेडीसाठीं गहाण ठेवलेला मी गुलाम आहें.

( **दरबारी कानडा** -त्रिताल )

**सदा विपदा या जिवा । अधीना**
**परिजना जगीं या ना आधार ॥ ध्रृ ॥**
**घातकि कां दिली । दैवें उदासिता**
**फुललि कलि-कला निराकार ॥ १ ॥**

गुलामाला अभिमान नसतो गुलामाला मान नसतो, गुलामाला स्वातंत्र्य नसतं, गुलामाला मेंदू नसतो, गुलामा इतका सहनशील प्राणी गाढवाच्या अवलादीत-सुद्धां सांपडणार नाही. चिमणे, हिंदुस्थानांत गुलामगिरी नाहींशी झाली म्हणून ब्रिटिश सरकार कंठरवानं सांगतं आहे पण या गोष्टीवर विश्वास ठेवणार आमच्या या खेड्यांतली गुलामगिरी पाहायला येताहेत कुठं ? त्यांना नेपाळांतली गुलाम-गिरी दिसते, त्यांना चहाच्या मळ्यांतली गुलामगिरी दिसते, त्यांना फिजी बेटां-

तली गुलामगिरी दिसते, पण या नादान सावकारांच्या घरीं कधीं न फिटणाऱ्या कर्जापायीं जडलेली गुलामगिरी पाहायला या खेड्यांत येतं आहे कोण ? गाद्या-गिरद्यांवर लोळत पडून वर्तमान पत्रांत लेख खरडणाऱ्या आमच्या पुढाऱ्यांची मोटार खेड्यांत येऊं शकत नाहीं म्हणूनच रघोजीरावाचा चाबूक माझ्यासारख्या निरपराध पोराच्या पाठींत बसतो आहे हें असंच चालायचं-जगाच्या अंतापर्यंत हें असंच चालायचं. कशाला आपलीं बिनमोल आसवं माझ्यासाठीं खर्चीं घालतेस ?

**चिमणी**—त्यानं तुम्हांला चाबकानं मारलं ?

**जगन्नाथ**—संगीत नाटकांतल्या गायकासारखं तेंच तेंच कडवं कशाला घोळते आहेस ? तो पहा. पाऊस आलाच. आकाश कसं अगदीं भरून आलं आहे. त्या पूर्वींच मला जाऊन शेताच्या मेरा पुऱ्या केल्या पाहिजेत. नाहीं तर चाबूक आहेच.

**चिमणी**—काय करूं ? काय केलं म्हणजे तुमची या गुलामगिरींतून सुटका होईल.

**जगन्नाथ**—एकवर्ष वाट पहात स्वस्थ राहा. मी माझा अभिमान सोडणार नाहीं, तीनशें रुपये मिळायचं कांहीं साधन नाहीं, आणि तिनशें रुपयांशिवाय-छे: छे: तीनशें रुपये आतां काय करणार ? नोकरनाम्याची मुदत संपल्या — शिवाय आतां या गुलामगिरींतून माझी सुटका नाहीं. येतो-चिमणे — हा गुला-माचा राम राम—! ( जातो )

**चिमणी**—गुलामाचा राम राम !

( बरुहा--त्रिताल )

**देवा तुज नाहिं दया । किती देसि घाय**
**सरल शांत हृदया ॥ धृ ॥ खोटा धरावा**
**दावा । तया देसि कां थारा । मानी**
**जनांच्या हरिसी विभवा ॥ १ ॥**

( दुसऱ्या बाजूनें जाते )

## प्रवेश तिसरा.

( रघोजीचा दिवाणखाना-मंजुळा व नागोजीराव बोलत आहेत )

**नागोजी**—मजुळाबाई, मी तुम्हांला दोष देत नाहीं. तुम्हांला दोष येतो तो एकाच गोष्टीचा. तुम्हीं रघोजीरावांना थोडं कह्यांत ठेवलं पाहिजे थोडं प्रेमानं वागलं कीं हीं असलीं माणसं सहज ताळ्यावर येत असतात. जरा लाडीगोडीनं घेतलं कीं वाटेल तसं वागवून घेणं तुमच्या हातचं नाहीं असं मला तरी वाटत नाहीं—

**मंजुळा**—प्रेम ! कसलं प्रेम ? मेला संशय-संशय नी संशय ! कांहीं केलं तरी तो मेला संशयच जात नाहीं प्रेमानं कसलं वागायचं ? एकानं प्रेम दाखवावं आणि दुसऱ्यानं आपलं बडवीत सुटावं, अशानं का कधीं प्रेमाचा संसार थाटत असतो ?

**नागोजी**—तुमचं म्हणणं खरं आहे. पण याला कांहीं उपाय नको का निघायला ? गरीब बिचारं पोर-हंसत मुखानं तुमच्या घरांत आलं—त्याला कारण नसतां फटक्याखालीं बडवणं माणुसकीला शोभतं कां ?

**मंजुळा**—मला काय विचारतां हें ? फटक्याखालीं बडवा म्हणून मी का त्यांना सांगितलं होतं ? त्यांनी अन्न देऊं नका म्हणून म्हटलं पण त्यांचीं काळीजफाडी बोलणीं ऐकून घेऊन सुद्धां मी त्याला शिदोरी बांधून नाहीं का दिली ? माझंच मला थोडं झालं आहे तिथं हें व्याह्याचं घोडं किती दिवस कुरवाळीत बसूं आतां ? तुम्हांला सर्व गोष्टी माहीत आहेत मग मला बिचारीला कां उगीच दुःखावर डागण्या देतां ?

**नागोजी**—खुळ्या मायेसाठी. पोराच्या स्थितीकडे पाहावत नाहीं म्हणून. गांजलेल्या आईबापांच्या डोळ्यांचा एकुलता एक तारा—असा टचकन तुटून गेला तर म्हाताऱ्यांचे शाप तुमच्या घराचा सत्यानाश करतील—

**मंजुळा**—एकदां होऊंदेच सत्यानाश ! मला कुठं कुणाचं कल्याण व्हावं असं वाटतं आहे ? कशाला व्हायला हवं कल्याण ? यांनी कधीं कुणाचं कल्याण केलं आहे ? कसं होईल यांचं कल्याण ? काय तें एकदां होऊन जाऊंदे म्हणजे

उजळ माथ्यानं जगांत सुखानं तरी नांदेन. पतिव्रतांच्या गोष्टी ज्यांनीं लिहिल्या ते सारे मेले पुरुष होते. माझ्यासारखी असला खवीस नवरा मिळालेली एख दो बायको असती म्हणजे तिनं निराळ्याच मायन्यानं पुरुषांचे कान उपटले असते.

**नागोजी**—मी आलों माझी कुळकथा घेऊन आणि तुम्हीं तर आपलीच कर्मकटकट माझ्या मागें लावली. माझा न्याय तुम्हीं करणार कीं मी तुमचा न्याय निवडीत बसूं—?

**मंजुळा**—दोन्हीं करूं नका आमचीं कर्मं आम्हांला भोगूं द्या. तुम्हीं कितीही माथेफोड केली तरी आमच्या दोघांच्या कपाळची कटकट कांहीं चुकायची नाहीं—उलट तुम्हीं कांहीतरी चाळवाचाळव करतां आहांत असं दिसून आलं तर ती वाढायची मात्र !

**नागोजी**—तेंही खरं आहे. काय करणार ? बाबाजीरावानं थोडी घाई केली नसती तर हा प्रसंगच मुळीं आला नसता

**मंजुळा** काय झालं असतं आणि काय झालं नसतं, याची वाटाघाट कशाला उगीच ! तुम्हीं आतां जा इथनं—येणं झालं मधेंच तर माझ्यावर भलभलतीं बालंटं घेणं होईल एक करतांना तिसरंच व्हायचं. मी गृहस्थाला न शोभण्यासारखं बोलतें असं वाटेल तुम्हांला कदाचित पण माझ्या अदृष्टानं मला हें असंच बनवलं आहे. घरीं आलेल्या पाहुण्याला नुसतं घोटभर पाणी पिऊन जा म्हणायची देखील चोरी कसलं हें घर आणि कसला हा गृहस्थपणा ? एकदां हे कपाळचं कुंकूं जाईल तेव्हांची सुटेन

**नागोजी**—काय अभद्र बोलतां हें ? कितीही त्रास झाला म्हणून कुणी नवऱ्याचं असं व्हावं म्हणून का म्हणत असतं ?

**मंजुळा**—उघड नसतील बोलून दाखवीत माझ्यासारख्या. पण मनांत काय म्हणत असतील तें तुम्हां पुरुषांना कळायचं नाहीं. आम्हीं बायका मोठ्या पाताळयंत्री असतों. आमच्या वरच्या रंगावर शहाण्यानं जाऊ नये.

**चिमणी**—( प्रवेश करून ) इथं बसून राहिलां आहांत का ? मी आपली शोध शोध शोधतें आहें मंजुळाबाई, आज रघोजीरावांनीं त्यांना चाबकानं मारलं कां हो ?

**मंजुळा**—होय-होय-होय-आतां किती जणानां किती वेळ सांगूं ? तोंड फाटून गेलं माझं उत्तर देतांना. जे उठलं तें जगन्नाथाची चौकशी करीत सुटतं ! मला त्रास होतो त्याची नाहीं तुम्हांला कधीं कींव आली ? त्या वेळीं नाहीं कुठं माझ्या कळवळ्यान धांवून आलांत ? पर दुःख पर शितळ—म्हणतात तें कांहीं खोटं नाही —

**चिमणी**—आम्हांला कळलंच नाहीं—

**मंजुळा**—कां कळत नाहीं ? आणि हें कसं कळलं आतां ? कधीं विचारायला आलां होतां मला ? - विचारलं असतं म्हणजे सारं कांही कळलं असत ! पण ती मी होतें—जगू नव्हता—

**चिमणी**—त्यांचा मत्सर का वाटतो तुम्हांला ?

**मंजुळा**—मत्सर वाटला असता तर त्याच्यासाठीं शिव्याशाप घ्यायला कशाला सरसावलें असतें हो ?

**चिमणी**—हें मला काय ठाऊक ?

**मंजुळा**—विचारल्याशिवाय कसं कळाव ! कधीं यापूर्वी कांहीं विचारायला कोण आलं होतं ? आतांच सर्वांना प्रेमाच्या उकळ्या उठल्या आहेत ! पण मी लग्नाची बायको. माझं कांहीं झालं तर गांवाला काय त्याचं ? पण जगू तुमचा लाडका-त्याला कुठं एक चाबूक बसल्याबरोबर सर्वांचीं काळजं फाटून निघालीं—!

**चिमणी**—माफ करा बाई ! झक मारली नि तुम्हांला विचारलं—मला नव्हता कळला हा तुमचा स्वभाव.

**मंजुळा**—चिमणे, राग आला का तुला ? सुभेदारसाहेब, तुम्हींच सांगा—मी चुकीचं का बोललें ? जीव आंतून कसा पेटतो हें कुणाला कधीं कुठं सांगायला मिळालं नव्हतं आज मिळाली संधी म्हणून पोटांतील खळमळ ओकून टाकतें आहे. चिमणे, मला क्षमा कर. पेटल्या काळजांतून अशी एखादी ठिणगी उडायचीच, तिचा चटकाही असा कुणाला तरीं लागायचाच.

( **जीवनपुरी**--त्रिताल )

**या मनिं नुरलि विषमता ममता ।**
**जीवनसरिता पाहिं दिसतां । तुटं**

परिमिता ॥ ध्रु ॥ विसरुनि मज बसला
विधाता ॥ उदासीन जिव जाइल मरतां ॥ १ ॥

**नागोजी**—चल चिमणे-मंजुळाबाई आतां घरांत जाऊन जरा मस्तक शांत करून घ्या. तुमचं मन कळण्याइतके दुःखाचे घाव मीहीं माझ्या आयुष्यांत सोसले आहेत. जा आतां कांही बोलूं नका—

**मंजुळा**—बोलूं नको ? कां बोलूं नको ? तेवढं सुद्धां सुख नको मला ? जगांत असून जंगलांत असल्यासारखी मी—कुणी वडीलधारं तर नाहींच पण बरोबरीच्या माणसाशी सुद्धां बोलायची चोरी-बायकांशीं सुद्धां बोलायचं नाहीं ! आणि इतक्या दिवसांत दोन माणसं दिसलीं त्यांच्याशीं बोलूं नको म्हणतां ?

**नागोजी**—आतां काय करावं हिला ?

**मंजुळा**—चिमणे, रागावलीस का ? नका ग कुणी माझ्यावर रागावूं. उद्यां माझी कांहीं बरी वाईट बातमी आली तर माझ्या वतीन चार शब्द बोलायला या उभ्या गावांत कुणी एकतरी माणुस आहे का ? चौघांनीं चार नावं ठेवलीं तर बरा बोल बोलायला पांचवं कुणी नको का पुढं यायला ? माझं तोंड काळं झालं तर एक पांढरं गालबोट ओढायला चिमणे, तूं येशील ना पुढं ? कीं आपली इतरां—सारखीच मला सुळीं द्यायला सरसावशील ?

**चिमणी**—म्हणजे ? तुम्हीं म्हणतां तरी काय ?

**मंजुळा**—काय म्हणूं ? माझं कपाळ. चिमणे, माझं कपाळ फुटलं आहे. ऐक-लंस ? माझं कपाळ फुटलं आहे. लग्न करूं नकोस--माझा उपदेश ऐक--लग्न करूं नकोस. लग्न केलंस तर तुझ्या आयुष्याची माती होईल. हे मेले पुरुष बायकांचीं हाडं खाण्यासाटीं उत्पन्न झालेले राक्षसच आहेत. कोणी तुझा कैवार घेऊन धांवा-यचा नाहीं. पुरुष पुरुषांकडे वळतील आणि या मेल्या बायकासुद्धां बायकोजातीचा अभिमान विसरून पुरुषांच्या पडपानं तुलाच छळायला उठतील. लग्न करूं नकोस—ऐकलंस--विहिरींत जीव दे पण लग्न करूं नकोस—( दारांत यादवराव दिसतो त्याला आड होण्यासाठीं खुणावते ) जा आतां. सुभेदारसाहेब ,जळतं त्याला कळतं हो. कांहीं बरं वाईट बोललें असेन तर पोटची पोरगी समजून क्षमा करा. आणि



**मंजुळा**—प्राण गेला तरी लग्न करूं नकोस! अं. २, प्र. ३.

तूं चिमणे, उद्यां कुणी मला नांव ठेवूं लागलं तर माझ्यासाठीं एकच बरा बोल या तुझ्या गोड ओठांतून काढ. कुठंहीं असला तरी माझा आत्मा तुला धन्यवाद देईल-देव तुझं कल्याण करील. जा-आतां एक शब्द मुद्धां बोलूं नकोस ( तिला लोटून बाहेर घालवते. ) सुभेदारसाहेब, मी तुमची धर्मकन्या आहे--मला आशिर्वाद द्या. ( नमस्कार करते )

**नागोजी**—देव तुला सद्बुद्धी देवो. पोरी, काय चालवलं आहेस हे ? आज कोणत पाप तुझ्या मनांत आलं आहे ?

**मंजुळा**—घर असं किडकं असलं कीं पापाचे किडे त्यांतून बाहेर पडायचेच. जा पाहूं आतां-क्षमा करा माझ्या मूर्खपणाबद्दल. पण जा एकदांचे.

**नागोजी**— ईश्वर तुझं कल्याण करो ! ( जातो )

**मंजुळा**—आतां या बाहेर. ( यादवराव येतो ) काय झालं ?

**यादवराव**— टांगा मिळाला. गाडीच्या वेळापूर्वीच टांगा पोचणार. पण त्याला उपाय नाहीं. आतां इथून न निघालों तर जगू किंवा रघोजी कुणीतरीं घरीं येतील आणि सारा बेत फिसकटून जाईल. आकाशांतल्या ढगामुळें काळोख कसा मी म्हणतो आहे. पावसाची सरही मधून मधून येतेच आहे. वेळ कशी सोन्यासारखी आहे. टांग्यांत बसल्यावर कुणींच आम्हांला ओळखायचं नाहीं.

**मंजुळा**—देवाचं नाव घेऊन माझी अब्रू तुमच्या हातीं देतें आहे माझा गळा तुम्ही कापणार नाही ना ?

**यादवराव** -असं कसं होईल माझे लाडके ?—

**मंजुळा**—हं खबरदार—तो शब्द उच्चारूं नका, कुणाची मी लाडकी नाहीं. माझी मी स्वतंत्र आहें. यादवराव, पापाच्या ओढीनं मी घराबाहेर पडत नाहीं. हें घरचं पाप घराबाहेर ओढून काढतं आहे. माझी अभिलाषा जर तुमच्या मनांत असेल तर आत्तांच तसं उघड उघड सांगा. तुम्हांला लाथ मारून मी एकटीच निघून जाईन. मी मराठ्याची मुलगी आहें. स्वतःचं संरक्षणकरण्या इतका धीर माझ्या नसांतून सळसळतो आहे. या पुढं पापाचं नुसतं नांव काढाल तर नरडं दाबून तुमचा जीव घेईन हें पक्कं लक्षांत ठेवा.

**यादवराव**—काय वेडेपणा हा ? प्रेमांत कधीं पाप असतं का ?

**मंजुळा**—मला प्रेम नको आहे आणि पापही नको आहे, मला स्वातंत्र्य पाहिजे आहे. पुन्हां सांगतें आहें कीं या गुलामगिरीला कंटाळून मी बाहेर निघतें आहें. पुरुषांच्या आसऱ्याशिवाय स्त्रियांना बाहेर पडतां येत नाहीं. एवढ्याचसाठीं मी तुमचा हात धरायला तयार झालें आहें. लहान मुलांना जेवढा पांगुळगाडीचा आधार तेवढाच आधार तुमच्या हातानं दिला कीं पुरे आहे. मला चालतां येऊं लागलं कीं तुमचा हात पांगुळगाडीसारखाच फेंकून देईन. मला प्रेमाचा आधार नको—आणि पापाचा ही नको—

**यादवराव**—जशी तुझी मर्जी. पण या माझ्या हृदयांत मात्र तुझ्या निर्मळ प्रेमाचीच एक जाणीव जागृत राहील हें मी तुला पुन्हां सांगतों. तूं ज्याला पाप म्हणतेस त्याला मी स्वर्ग म्हणतो क्लेशांत दिवस काढले की प्रेमाचं ओझं नाहीसं होतं. क्लेशाचे मेघ दूर झाले कीं प्रेमाचा सूर्य उगवू लागेल त्या वेळीं मात्र मंजुळे हा तुझा दास त्या सूर्यकिरणाचें स्नान करण्यासाठीं आपलं मस्तक तुझ्या पुढें नम्र करील.

**मंजुळा**—पुरे करा ही बडबड, उशीर होत चालला. ( कोचामागून कपड्याचें पाकीट व एक डबा घेते ) हें घ्या माझं पाकीट, हा दागिन्याचा डबा, नीट जपून जवळ ठेवा. दहा हजारांचे दागिने आहेत आंत—

**यादवराव**—अस्सं ? एवढं जोखीम ?

**मंजुळा**—सारं आयुष्य कंटायचं आहे मला घराबाहेर. हा घ्या डबा— ( जगू येतो )

**जगन्नाथ**—कोण यादवराव ? काय आहे ? बाईसाहेब, हा कसला डबा ? हें कसलं पाकीट ( यादवरावाच्या हातून पाकीट पडतें. तो स्तब्ध पाहात उभा राहातो ) कायरे बेरडा, गृहस्थाच्या बायकोला फुसलावून घरा बाहेर काढतांना—

**यादवराव**—कोण कुणाला फुसलावत आहे ?

**जगन्नाथ**—बाईसाहेब, मी तुम्हांला ' आई ' म्हटलं, तें आतां मागं घेणार नाहीं पोराच्या तोंडाला तुम्हींच का काळोखी लावतां आहांत ? सकाळची प्रतिज्ञा




रघोजी—पापी ! मात्रागमनी !          अं २, प्र. ३.

कुठं गेली ? एवढया थोडया वेळांत विसर पडला ? बोला-कांहीं उत्तर द्या.

**यादवराव**—ती काय उत्तर देते ? आपण होऊन तिनं मला टांगा आणायला सांगितला. आपण होऊन तिनं हें सामान बांधलं. आपण होऊनच आतां तिनं दागिन्यांचा डबा माझ्या हातीं दिल्याचं तूं प्रत्यक्ष पाहिलंस—

**जगन्नाथ**—आणि आपण होऊनच—बेरडा—तूं या अजाण स्त्रीला घराबाहेर निघण्याची भूल घातलीस. रघोजीराव तुला बरोबर बोलावीत होते—कां गेला नाहींस शिकारीला ?—

**यादवराव**—हिनं थांबवून घेतलं म्हणून.

**जगन्नाथ**—( मंजुळेकडे वळून ) होय ! आई, हें काय केलंस ?

**मंजुळा**—नको-जगू-नको-मला आई म्हणूं नकोस !

**जगन्नाथ**—कां 'आई' म्हणूं नको ? वाईट वाटतं ? पोराच्या समोर पाप करायला वाईट वाटतं ? पोराच्यासमोर—कुठल्याही पोराच्या समोर उजळ माथ्यानं जी गोष्ट करतां येत नाहीं ती कोणत्याही स्त्रीनं केव्हांही करूं नये. अरे ये बेरडा, जा तोंड घेऊन. मायलेकरांचा पवित्र संवाद ऐकण्याची तुझी पात्रता नाहीं. ( यादवराव जातो ) आई—आई —या लेकराचा कां असा गळा कापलास ?

**मंजुळा**—क्षमा कर-जगू-मला क्षमा कर—हें पाकीट आंत ठेव. हा घे दागिन्यांचा डबा—

( यादवराव रघोजीला घेऊन येतो व बोटानें दाखवितो. जगूनें मंजुळेचा एक हात धरला आहे-दुसऱ्या हातांत डबा आहे )

**रघोजी**—हरामखोर—पापी—मात्राममनी—(रघोजी बंदुक रोखतो. यादवराव जगन्नाथवर पिस्तुल रोखतो. जगन्नाथ चमकून मागें सरतो. मंजुळाही मागें सरते. रघोजी पुढें होत असतां यादवरावाची गोळी रघोजीला लागते. जगू त्याच्याकडे वांकत असतां मंजुळा यादवरावाच्या हातचं पिस्तुल काढून घेते. मंजुळेच्या हातीं पिस्तुल दिसतांच जगू तें काढून घेतो. )

**जगन्नाथ**—जा--आंत जा. मी आतां पकडला जाणारच, तूं इथं राहूं नकोस. तुझं पाप कोर्टासमोर तरी नको यायला. मी दुर्दैवी आहें—माझ्या मर-

णानं तरी तुझ्या अब्रूवर झांकण पडो. जा—कुणी यायच्या पूर्वी जा—'आंत निजले होतें म्हणून सांग जा—जा.—पाहूं नको मागं. मीही तसंच सांगेन—जा--जा—( मंजुळा रडत रडत आंत जाते )

**लहानू**—(प्रवेश करून) धनीसाब—धनीसाब—धांवा—या बेरडानं धनीसाबास्नीं गोळी घातली. ( पोलीस व यादवराव येतात. )

**यादवराव**—हा पहा बेरड—यानं रघोजीरावांना गोळी घातली.

**पोलीस**—हें एवढंसं कारटं--ए पोरा, हात पुढं कर. तो दागिन्यांचा डबा जप्त करा.

**मंजुळा**—आवाज कसला झाला ?—

**यादवराव**—या जगूनं तुमच्या नवऱ्याचा खून केला—

**मंजुळा**—हाय रे दैवा—( रघोजीच्या अंगावर पडते )

**यादवराव**—राम राम—जगोबाराव—रामराम—

**पडदा.**

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

(रघोजीच्या घरांतील एक खोली, यादवराव सिगारेट ओढीत येरझाऱ्या घालीत आहे)

**यादवराव**—लहानू—अरे ए लहानू—लहान्या—

**लहानू**—(प्रवेश करून) जी—अगदीं धनीसाबांची ऐट आलीया जनू !

**यादवराव**—फार फाजिल झाला आहेस—चाबकाची संवय सुटली आहे कीं नाहीं !

**लहानू**—त्यो अदिकार घेनार वाटतं हातांत ?

**यादवराव**—घेईन सुद्धां. पण मी गांवढळ नाहीं. मी गांवढळ असतों तर यापूर्वीच तुला बडवला असता. ऐक—उद्यां तुझी साक्ष आहे-आहे ना ? काय सांगणार आहेस कोर्टांत ?

**लहानू**—काय सांगू जी ?

**यादवराव**—आतां मीच तुला पढवतों. म्हण—ईश्वरास स्मरून खरं सांगेन-खोटं बोलणार नाहीं.

**लहानू**—म्यां कंदीं खोटं बोललों जी ?

**यादवराव**—सांगितलेलं ऐक ! असं सांगितलं कोर्टानं, कीं तसंच बोल्लं पाहिजे. बरं—तुझं नांव काय ?

**लहानू**—नांव लहानू—आई म्हंगत व्हती बाबू-अन् धनीसाब रागावल्याती की म्हगतात 'गाढीच्या' !

**यादवराव**—असं नव्हे—तुझं अन् तुझ्या बापाचं नांव अन् आडनांव सांगायचं. बरं आतां असं सांग—ज्या दिवशीं हा गुन्हा घडला त्या दिवशीं सकाळीं काय झालं होतं !

**लहानू**—म्यां न्यारी केली व्हती !

**यादवराव**—काय मूर्ख आहेस रे ! त्या दिवशीं रघोजीराव आणि जगू यांचं भांडण झालं होतं ?

**लहानू**—जी व्हय्—जी व्हय्—आतां आलं ध्येनांत आता इचारा होव त्ये. म्यां सांगन–धनीसावांनी असं बदाडलं त्या प्त्तेरामनी !

**यादवराव**—तें सांगायला हवंच. पण मुख्य गोष्ट काय ?–हं—असं बदडलं तेव्हां जगूनं काय केलं ?

**लहानू**—वराड-वराड-वराडला दसऱ्याच्या बोकडावानी वराडला जनु !

**यादवराव**—ठीक. आतां सांग—रघोजीरावांनीं त्याला कां मारलं ?

**लहानू**—आदतच वंगाळ--मारल्याबिगर न्हावत न्हाई—हात शिव—शिवत्याती.

**यादवराव**—ठीक. फटके दिले तेव्हां आरोपी काय म्हणाला ?

**लहानू**—कवळा प्वार त्यो—ढसाढसा रडला रेडकावानी, म्हून सांगितलं न्हव का ?

**यादवराव**—तसं नव्हे 'खून करीन' असं म्हणाला होता ना तो ?

**लहानू**—जी व्हय्—जी व्हय्—अशी आठव करूनशान द्या की !

**यादवराव**—तिथं कोर्टात नाहीं असं सांगतां यायचं. हं सांग, काय म्हणाला जगू ? बरोबर त्याचे शब्द सांग

**लहानू**—'खून पाडीन' म्हंगाला, की 'मुडदा पाडीन' म्हंगाला त्ये मातुर आठवत न्हाई

**यादवराव** ठीक--ठीक. आतां असं सांग—तो असं कां म्हणाला ?

**लहानू**—हां–माजा बी त्योच परश्न हाय—कां असं म्हगावं ?—बाकी प्वार जात. म्हगाला बी असल. म्यां बी म्हंगालों असतों.

**यादवराव**—असं म्हणायचं नाहीं. असं सांगायचं, कीं तो भारीच चिडला होता—मारलं म्हणून चिडला होता

**लहानू**—जी व्हय्- त्येबी खरच. पन् काम लई वंगाळ झालं पघा तिळा-एवढं प्वार—खून काय करतुया अन् मुडदा काय पाडतुया !

**यादवराव**—एवढं मात्र घ्यानांत टेव बाकी कांहीं जरी बोललास तरी एवढं मात्र चुकूं नकोस. काय म्हणाला ? 'खून पाडीन' ! कुणाचा ?

**लहानू**—तुमचा न्हव का! न्हाइ-न्हाई--माजा—न्हाई धनीसाबांचा खून धनीसाबांचा खून ! च्यः ! कसं ध्येनांत न्हावं जी ? धनीसाबांचा खून ! ( मोठ्यान ओरडतो. मंजुळा येते )

**मंजुळा**—काय झालं रे लहानू ?

**लहानू** खून ! मुड्दा ! चाबूक ! माजं नांव—बापाचं नांव—नि आडनांव !

**यादवराव** -थोडी चांचणी पाहात होतों त्याची—

**मंजुळा**—असं ? पढवित होतां ! शरम नाहीं वाटत ? अपराध कुणाचा ?

**यादवराव**--हं—चूप—लहानू, चालता हो इथनं.

**लहानू** खून—मुड्दा --( म्हणत जातो. )

**मंजुळा**—ही उपकारांची फेड अं ! त्यानं तोंड उघडलं तर काय होईल ?

**यादवराव**—चूप—बोलूं नकोस-बायजाबाई येते आहे—जातो मी. (जातो)

( बायजाबाई प्रवेश करते )

**बायजा**—काय झालं मंजुळाबाई, निकाल लागला का खटल्याचा ?

**मंजुळा**—निकाल लागला माझ्या कर्माचा ! असल्या या तोंडानं भर कोर्टांत जाऊन उभं राहावं लागलं. हा काय माझा दोष ? रस्त्यानं जाणारीं सारीं लोकं माझ्याकडे बोट दाखिवतात—काय मी त्यांचा खून केला ?

**बायजा**—असं बोलं नये ! लोकं अशीं म्हणायचींच. त्यांच्या तोंडाला हात का धरतां येतो आहे ? पण खटल्याचं काय झालं ?

**मंजुळा**— म्हणत नाहीं कोण कांहीं मला. नुसतीं बोटं दाखिवतात आणि फिदिफिदी हंसतात मी काय कुणाचं केलं ? माझा काय संबंध यांत ? तुमच्या जगूमुळं मला हे असे धिंडवडे सहन करावे लागताहेत.

**बायजा**—जगूमुळं कशाला म्हणतां ? आमच्यामुळंच म्हणाना. आम्हीं कुठं साताजन्मीं पातकं केलीं होतीं—तीं निस्तारावीं लागताहेत त्या बिचाऱ्याला. आमच्या पोटीं आल्याचं एक पातक केलं कीं नाहीं त्यानं ? शिक्षाच कांहीं कुणाला करायची तर तिचे खरे धनी आम्हीं. बरं हॉस्पिटलांतली कांहीं हकीकत कळली का ? नि केसचं काय झालं ?

**मंजुळा**—अजून कांहीं शुद्धीवर येणं झालं नाहीं. शुद्धी आल्यानंतर मग खटल्याचं काय व्हायचं तें होईल. कुणी मरो–कुणी जगो–माझ्या कपाळची कर्मकटकट कांही चुकायची नाहीं. शिवाय विसरेन म्हटलं, तर तुमच्यासारखीं जिव्हाळ्याचीं माणसं आहेतच मधून मधून आठवण द्यायला.

**बायजा**—माझ्या दुःखानंच मी भाजून गेलें आहें, तिथं तुम्हांला चटके द्यायला कशाला मी येणार आहें? आतां कोर्टांतून तुम्हीं आलांत म्हणून कळलं, म्हटलं दारींच गांठीन तुम्हांला—

**मंजुळा**—दारींच कां? दाराची पायरी चढायची नाहीं आमच्या—अशी प्रतिज्ञा केली आहे कीं काय?

**बायजा**—प्रतिज्ञा कसली? पण या घराची पायरी चढायला मन कसं घेईल मंजुळाबाई? मागल्या पुढल्या सर्व गोष्टींची आठवण करा—म्हणजे तुम्हांलाही यांत कांहीं गैर वाटणार नाहीं. या घरापायीं आमच्या जन्माची राखरांगोळी झाली. सोन्यासारखा एकुलता एक मुलगा—तोही हा असा कायद्याच्या कैचींत सांपडला! काय म्हणून या घराबद्दल प्रेम वाटेल आम्हांला?

**मंजुळा**—मेली तीनशें रुपयांची बाब—त्याच्यापायीं हे एवढे अनर्थ. मी माझे दागिने देतें म्हटलं, तुम्हांला तें पटलं नाहीं—

**बायजा**—तुमचे दागिने म्हणजे त्यांच्याच मालकीचे. त्यांचाच माल घेऊन त्यांना द्यायचा—

**मंजुळा**—त्यांचं कांहीं देत नव्हतं मी तुम्हांला. मी देतें म्हणत होतें ते दागिने माझ्या माहेरचे होते.

**बायजा**—मंजुळाबाई, मी मराठ्याची बायको आहें. दुसऱ्याचं दान घेऊन जगण्यासाठीं आम्हां मराठ्यांचा जन्म नाहीं दान घेण्याइतकी मराठ्याची पायरी आम्हीं सोडली असती तर वर्गण्या करून देखील रक्कम मिळवितां आली असती. भिकेच्या अन्नावर मराठ्याचं रक्त वाढत नसतं बरं मंजुळाबाई! तुम्हींही मराठ्याच्याच आहांत. तुम्हांला हें कळलं पाहिजे होतं.

**मंजुळा**—माफ करा बायजाबाई, माझं डोकं हल्लीं ठिकाणावर नाहीं. भरक-

टल्या मनानं कांहीं तरी बरळलें त्याची क्षमा करा. काय करूं—कांहींच सुचत नाहींसं झालं आहे मला. आज भर कोर्टांत मला उभं राहावं लागलं—आणि तेही चांगला सव्वाहात पदर पुढं ओढून. माझ्या ऐवजीं दुसरीच कुणी उभी केली असती तरीही कुणाला कळलं नसतं. त्यांतून हीं संस्थानी कोर्टं—कांहीं ताळ नाहीं मेळ नाहीं. वकील कसले—मेले नांवाचे वकील. कशा तरी सनदी मिळवतात आणि वकिली चालवतात. काय वाटेल तें विचारित होते. मीही तशींच उत्तरं देत होतें. गाढवांचा गोंधळ आणि लाथांचा सुकाळ. कसली खटल्याची काळजी करतां? होईल झालं काहीं तरी निकाल!

**बायजा**— असं म्हटल्यानं का मनाची समजूत होते मंजुळाबाई, पोटचा गोळा यमाच्या वेशीवर उभा आहे माझा. आंतड्याला पीळ पडला कीं वाचेला कुलूप घालतां येत नाहीं. कांहींही करा पण माझ्या जगूवरचं एवढं किटाळ दूर होईलसं करा.

**मंजुळा**—मी काय करणार? मी काय पाहिलं आहे कीं ऐकलं आहे? समोर दिसलं तें मी सांगितलं. माझ्या साक्षींत कांहींसुद्धां निघालं नाहीं. मी होतें घरांत—बाहेर आलें आणि पाहिलं तो हा प्रकार! रक्ताची धार पाहून मला घेरी आली. पुढं काय झालं तें मला कळलं सुद्धां नाहीं.

**बायजा**—काय करूं? कुणाचे पाय धरूं? माझं मन सांगतं, जगूनं गोळी झाडली नाहीं. जगूनं तर मुक्याचं व्रत घेतलं आहे. हजार प्रश्न विचारले, तर एकाचंही उत्तर देत नाहीं. वकील गेला—त्यालाही तेंच. इकडे आमचीं काळजं फाटताहेत आणि त्याच्या तोंडून ब्रही निघत नाहीं. असं पाहिलं कीं वाटतं, खरोखरच त्यानं गोळी झाडली तर नाहीं ना?

**मंजुळा**—मला देखील तसंच वाटतं —( दचकते व डोळ्याला पदर लावून रडूं लागते. )

**बायजा**—उलटा प्रसंग आला आहे. माझं समाधान तुम्हीं करायचं—कीं मी तुमचं? उगी--उगी–रडूं–नका–जा आतां घरांत. कातरवेळा झाली—या वेळीं असं रडूं नये. तिकडे तो तसा प्रसंग–ते हॉस्पिटलांत पडलेले–अशा वेळीं असं

रडूं नये. बरे होतील—घरीं येतील, तेव्हां तुमचंही संकट जाईल आणि आमचंही जाईल.

**मंजुळा**—कशावरून ? जगूनंच गोळी घातली असली तर त्याचा बचाव करण्याची बुद्धी त्यांना चुकून सुद्धां व्हायची नाहीं. अगदीं आपली आपल्यालाच त्यांनीं गोळी घालून घेतली असती, तरी देखील जगूचा सूड उगवण्यासाठीं मरणाच्या शेवटच्या श्वासाबरोबर यांनीं जगूवरच आळ घेतला असता. असला विचित्र स्वभाव–आणि तुम्हीं म्हणतां, कीं बरे होऊन येतांच जगूला सोडवतील ! विसरा बरं बायजाबाई, आपल्या मनावरून जगाची पारख करूं नका.

**बायजा**—बावरलेलं मन काडीचा आधार शोधित असतं ! काय होईल काय सांगावं ? स्वस्थ बसावं आणि पुढं काय होतं तें पाहावं, असं म्हणण्याखेरीज आतां दुसरा उपाय नाहीं.

**मंजुळा**—मी त्यांची बायको–मीच असं बोलतें म्हणून मला दोष देऊं नका. मला कळतं म्हणूनच मी बोलतें. दुसरीं माणसं दुसऱ्या गोष्टी सांगतील, तुम्हांला खोटा धीर देतील. मी नाहीं तसं करणार–मला खरं बोलायचं आहे—तोंडदेखलं बोलून तुम्हांला फसवायचं नाहीं.

**बायजा**—असं ना तसं—कसं तरी मनाचं समाधान झालं. बरं झालं आलें ती एवढं तरी कळलं. तुमचं दु:ख तुम्हांला भारी झालं असतांना मी आपली माझंच गाणं गायला आलें त्याची क्षमा करा. ( जाते )

**मंजुळा**—माझं दु:ख मला भारी झालं आहे ! हो—झालं आहे. पण तें कसलं, हें या शेजाऱ्यापाजाऱ्यांना कसं कळणार ? एक क्षणाची चुकामुक झाली असती तर आज रानींच्या चंडोलागत मी स्वच्छंद विहार करित राहिलें असतें. पण नशिबानं दावा साधला आणि भलतंच कांहीं होऊन बसलं. किती बेमालुम खोटं बोलत होतें मी आतां ? कोर्टांत सुद्धां किती बेमालूम बतावणी केली ! एक शब्द खोटा आला तर कासावीस होणारी मी—मी ही अशी कां झालें ? कुणी मला राक्षसीण बनवलं ? परिस्थितीनं ? माणसानं ? कीं नवरा म्हणवणाऱ्या त्या राक्षसानं ? कोण माझ्या प्रश्नाचं उत्तर देईल ?

( सूरमल्हार--त्रिताल )

**या प्रणयी ललना ममा । ये परकामना ।**
**आभास दे भयभावना ॥ ध्रु ॥**
**मानमया हृदया अबलेच्या । कटुता ये**
**हताश दीन ॥ १ ॥**

( जाते )

---

## प्रवेश दुसरा

( तुरुंगांतील कोठडी—जगन्नाथ एका बांकावर बसला आहे. जवळ मातीचें परळ व मडकें व दोन घोंगड्या पडल्या आहेत. बाहेर पाहारेकरी कांहीं अंतरानें फेऱ्या घालीत आहे. )

**जगन्नाथ**—मी काय केलं हें ? मंजुळाबाईच्या अपराधावर पांघरूण घालतांना स्वतःच्या गळ्याला फांसाची दोरी लावण्याची तयारी कां केली ? हें योग्य झालं कीं अयोग्य झालं हें कोण मला सांगेल ? रघोजीरावाचं काय झालं असेल ? हजार प्रश्न मनांत येतात पण या शून्याच्या गाभ्यांत मला उत्तर कसं मिळणार ? कोण उत्तर देणार ? आतां कुणाचा आधार ? आधार फक्त एकच !—

( अभंग. )

**जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती । चालविसी**
**हातीं धरोनियां ॥ १ ॥ चालों वाटे आम्हीं तुझाचि**
**आधार । चालविसी भार सवें माझा ॥ २ ॥**

( पडद्यांत—शिपाई—जी साहेब, म्हणून मंजुळेला घेऊन येतो. ती येऊन बारांशी उभी राहते. जगन्नाथ तिच्याकडे पाठ करून बसलेला असल्यामुळें ती आल्याचें त्याच्या ध्यानांत येत नाहीं )

**मंजुळा**—जगन्नाथ—

**जगन्नाथ**—कोण ? तुम्हीं ? मला भेटायला आलांत ? कां आलांत ?

**मंजुळा**—खरंच—कां आलें ? जगन्नाथ, काळजाला पीळ पडल्यावर ओंठा-

श्राट दोन शब्द तरी काढावेसे वाटतात असं नाहीं तुला वाटत ?

**जगन्नाथ**—मला काय वाटतें तें बाईसाहेब, तुम्हांला कोणत्या शब्दांनीं सांगूं ? तुमच्या काळजाला पीळ पडला असेल पण माझ्या मानेला फांस लागला आहे. तुमचं अंतःकरण तुटत असेल पण माझ्या आयुष्याची दोरीच तुटूं लागली आहे. भर कोर्टांत शपथेवर खोटं बोलतांना तुम्हांला दुःख होत होतं, हें मला दिसत होतं. पण खोटं बोलण्याइतकं सामर्थ्य तुम्हीं दाखविलं. मी मात्र दुबळा ठरलों. खोटं बोलण्याची मला छाती झाली नाहीं. स्वतःचा बचाव करण्याची इच्छा असतांना—खरं बोलण्याचीही मला छाती झाली नाहीं—मग खोटं बोलणं !—पण तुम्हीं खोटं बोललांत, अगदीं बेमालुम नाहीं—तरी पण खोटं बोलण्यांत तुम्हांला बरंच यश आलं.

**मंजुळा**—तुझ्याच सांगण्यावरुन मी खोटं बोललें नाहीं का ?

**जगन्नाथ**—होय—मीच सांगितलं. पण तुम्हांला तें पटलं. खरं बोलावं आणि जगूला सोडवावं, असं तुम्हांला वाटलं नाहीं—हं थांबा—त्याबद्दल मी तुम्हांला दोष देत नाहीं. पुरावाच तसा बळकट होता. चाऱ्ही बाजूंनीं मी घेरला गेलों होतों. कुणी सांगावं ? कदाचित तुमचं खरं बोलणंच खोटं ठरलं असतं. न्यायाचा फार्स करणाऱ्या या अधिकाऱ्यांनी—पुराव्याच्या जोरावर न्यायाची कसोटी लावणाऱ्या त्या यमदूतांनीं-तुमचं खरं बोलणं माझ्या बचावासाठीं आहे असाच समज करून घेतला असता. तुमचं खरं बोलणं फुकट गेलं असतं आणि पृथ्वीच्या मोलाची तुमची अब्रु मात्र गमावली असती. नाहीं—बाईसाहेब, मी तुम्हांला दोष देत नाहीं. माझ्या कर्मालाही मी दोष देत नाहीं. ईश्वर आपल्याला जी बुद्धी देतो, ती आपल्या कल्याणाकरतांच देत असतो. संकटाच्या एका चमकत्या क्षणांत त्यानं मला मार्ग दाखवला. तोच मी तुम्हांला सांगितला. तुम्हींही त्याचप्रमाणं वागलांत. झालं तें ठीक झालं. ( एक क्षणभर दोघें स्वस्थ राहातात. )

**मंजुळा**—ठीक झालं-असं मी कसं म्हणूं ?

**जगन्नाथ**—तुम्हीं नका म्हणूं हवं तर ! पण मी म्हणतों कीं झालं तें ठीकच झालं.

**मंजुळा**—सोन्यासारखा एक जीव माझ्यापायीं खर्ची पडणार का ?

**जगन्नाथ**—चित्रगुप्ताच्या वहीखात्यांत हा जमाखर्च होऊन गेला आहे. तुमच्या रक्ताच्या तांबड्या शाईनं सुद्धां तो आंकडा आतां खोडला जाणार नाहीं.

**मंजुळा**—तुझ्या आईबापांना काय वाटेल ?

**जगन्नाथ**—माझे आईबाप ! माझ्या आईबापांनीं मला ज्या दिवशीं विकला—त्याच दिवशीं मी मेलों. मी गुलाम झालों—त्याच दिवशीं मला मृत्यू आला. त्यांना काय वाटायचें ? गहाण ठेवलेली वस्तू सावकाराकडे चोरीला गेली तर त्या दागिन्याच्या मालकाला जें वाटेल तेंच. मी त्यांचा आवडता होतों—एक बिनमोल दागिना होतों—पण मला त्यांनीं गहाण टाकलं. गहाणाची मुदत टळली तर दागिना हातसांड करावा लागतो नाहीं का ? तसंच त्यांनीं समजावं.

**मंजुळा**—किती निर्दय आहेस जगू ! तुझी आई मला भेटली—

**जगन्नाथ**—काय ? माझी आई तुम्हांला भेटली ?—केव्हां ? कुठं ? काय म्हणाली ती ? अरेरे ! माझी आई ! आई—आई--!

**मंजुळा**—ती काय म्हणाली, तें कळायला आईचं आंतडं असावं लागतं. तुमची पुरुषांची जात—नीच—स्वार्थी—आपमतलबी !—

**जगन्नाथ**—काय ? मी सुद्धां तसाच ?—

**मंजुळा**—होय—तूंही तसाच ! काय फरक आहे इतर पुरुषांत आणि तुझ्यांत ?

**जगन्नाथ**--कांहींच का फरक नाहीं ? रघोजीरावाच्या किंवा यादवरावाच्या पंक्तिला मलाही बसवणार तुम्हीं ?

**मंजुळा**—कां बसवूं नये ? सारे एका माळेचे मणी ! पुरूष म्हटला, कीं मला काय वाटतं, तें मी कोणत्या शब्दांनीं सांगूं ? काय फरक आहे तुमच्यांत ? माझ्या अब्रूसाठीं फांसावर चढायला तूं तयार झालास. तुला वाटलं, यांत मोठा स्वार्थत्याग झाला. मीं कबूल करतें, कीं हा तुझा स्वार्थत्याग आहे. पण हा स्वार्थत्याग मी येतांच माझ्या दांतावर मारलास, तिथंच त्याची किंमत कमी झाली. त्याच वेळीं तूं आपमतलबी स्वार्थी ठरलास. तुझी आई—काय वर्णन करूं त्या माउलीचं—तिला काय वाटायचं म्हणतोस ? आईला काय वाटत असतं, हें पोरांना

कळत नसतं. त्यासाठीं आई व्हावं लागत. आई झाल्याशिवाय आईचं आतडं कसं तुटतं, तें कुणालाही कळायच नाहीं. मीही तुझी आई—मानलेली आई-खोटी आई. माझी ही स्थिती! आणि जिनं तुला नऊ महिने पोटांत वागवलं होतं!—मरो ही पुरुषांची जात!

**जगन्नाथ**—( मोठ्यानें हुंदके देत ) माफ कर—आई, या चुकलेल्या लेंकराला माफ कर.

**मंजुळा**—तुला आईबापांनीं गुलामगिरींत लोटलं म्हणून चवताळून त्यांना तूं नांव ठेवूं लागलास. आम्हीं बायकांनीं काय करावं? स्वातंत्र्य गेलं म्हणून तुझ्या काळजाला घाव बसला, पण आमच्या स्वातंत्र्याची तुला कधीं आठवण झाली होती? कधीं तळमळला होतास का बायका गुलामगिरींत आहेत म्हणून? बायका गुलामगिरींत आहेत याची जाणिव तरी होती का तुला? तुला माझी दया आली! कां दया आली? मी गुलामगिरींत आहें म्हणून का दया आली?

**जगन्नाथ**—कां दया आली? स्त्रीदेवतेच्या अब्रूच्या रक्षणासाठीं—

**मंजुळा**—कुठल्या नाटकांतलं वाक्य आहे हें? स्त्री देवता म्हणे? गुलामांचे देवही जर गुलाम असतील तरच स्त्रिया देवता ठरतील. देवता! देवता म्हणजे गुलाम का?

**जगन्नाथ**—आई, क्षमा कर क्षमा कर. मी सर्वस्वीं अपराधी आहें. मी स्वार्थी आहें—आपमतलबी आहें. हा विचार कधींच माझ्या मनांत आला नाहीं.

**मंजुळा**—म्हणूनच मला त्या दिवशीं अडवलंस? तुला वाटलं, कीं मी पापी आहें. वाटलं ना?—कां बोलत नाहींस आतां? मला पापापासून बचावण्यासाठीं तूं पुढं सरसावलास खरा, पण गुलामगिरींतून सुटूं पाहणाऱ्या एका जीवाला तूं कायमचं गुलामगिरींत जखडून टाकलंस!—यांत माझं काय हित साधलंस? एक क्षणभर थांबला असतास तर आज मी स्वतंत्र झालें असतें, त्यांचा खूनही पडला नसता आणि तूंही असा फांसाच्या दोरीकडे पाहात राहिला नसतास!

**शिपाई**—बाईसाहेब, वेळ भरली. चला निघा. दुसरीं माणसं वाट पाहताहेत.

**जगन्नाथ**—आई. पुनः विनंती करतों, मला क्षमा कर. मी पोर आहें—

अजाण आहे—दुसऱ्याची गुलामगिरी मला कळली नाहीं. मी माझ्याच गुलामगिरीकडे पाहात राहिलों.

**मंजुळा**—जगू, तुला पुन: सांगतें, कीं जगलें वांचलें तर अजूनही या गुलामगिरींतून सुटायचा प्रयत्न केल्यावांचून मी राहाणार नाहीं. ( जाते )

( जगन्नाथ हातानें मस्तक दाबून धरून अभंग म्हणतो. )

**( अभंग )**

**बोलूं जातां बरळ करीसी तें नीट । गेली**
**लाज धीट केलों देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां**
**खेळतों कौतुकें । झालें तुझें सुख अंतर्बाह्य ॥ ४ ॥**

( इतक्यांत बाबाजी व बायजा येतात )

**बायजा**—जगू—जगू.

**जगन्नाथ**—कोण ? आई ? ( बायजा त्याला कवटाळते )

**बायजा**—जगू, बाळ, कुठं आलास हा ?

**जगन्नाथ**—एका तुरुंगांतून सुटून दुसऱ्या तुरुंगांत आलों. त्या तुरुंगापेक्षां—आई—हा तुरुंग पुष्कळ बरा.

**बाबाजी**—नको, जगू, दु:खावर अशा डागण्या देऊं नकोस !

**बायजा**—नाहीं जगू, चांगल्या डागण्या दे. आम्हीं केलंच तसं तुला असा गहाण टाकला नसता तर हा प्रसंग तुझ्यावर कां आला असता ?

**जगन्नाथ**—आई, कां आपल्याला दोष लावून घेतेस ? माझ्या प्राक्तनासारखी तुम्हांला बुद्धी झाली, त्यांत तुमचा काय दोष ? मी तुरुंगांत पडावं असं का तुम्हांला कधीं वाटेल ?

**बाबाजी**—या तुरुंगापेक्षांही मोठ्या तुरुंगांत मी आधीं तुला टाकलं. एकदां रघोजीच्या घरांत तुला लोटल्यावर अमुक संकट आलं आणि अमुक येईल, याची खंत बाळगण्यांत काय अर्थ ? वाडवडिलांनीं बांधलेलं घर—तें हत्तीचं मढं—हातीं टिकवण्यासाठीं मी तुला वाघाच्या जबड्यांत लोटलं. मेलेल्या वडिलांचं नांव राखण्याच्या खोट्या हव्यासानं जिवंत पिढी तोडायला मी तयार झालों. आतां तुला

इथं पाहून दुःख कशाचं करूं ?

**बायजा**—पण जगू, हा अविचार कां केलास ? मनुष्यहत्त्येचं पातक करून कुळाचं नांव कां बुडवलंस? रघोची मेला, म्हणून फेडल्याशिवाय का त्याचं कर्ज फिटतं ? जगू काय केलंस हें ?

**जगन्नाथ**—त्याचा तोच आपल्या मरणाला कारणीभूत झाला.

**बायजा**—पण तुझी सहनशक्ती कुठं गेली ? त्यानं तुला मारलं-निर्दयपणानं चाबकानं मारलं म्हणून तूं त्याच्यावर-आपल्या धन्यावर उलट गोळी झाडावीस ! माझ्या पोटच्या मुलानं हें असं कसं केलं ?

**जगन्नाथ**—आई, काय सांगूं ? माझं तोंड बांधलं गेलं आहे. मला कांहीं बोलतां येत नाही.

**बायजा**—आपल्या आईजवळ देखील ?

**जगन्नाथ**—माझ्या आईजवळ देखील. आई, तुला एकच सांगतों. माझ्यावर विश्वास ठेव. मी निर्दोष आहें.

**बायजा**—मग कोर्टात तसं कां सांगितलं नाहींस ?

**जगन्नाथ**—मी कोर्टात तसंच सांगितलं.

**बायजा**—नुसतं तसं सांगितलंस-पण तूं कसा निर्दोषी आहेस तें कां नाहीं सांगितलंस ? आपला पुरावा कां नाहीं पुढं मांडलास ? सुभेदारसाहेबांनीं तुझ्यासाठीं वकील दिला, त्याला तूं कांहींच सांगितलं नाहींस. तुझ्या या करण्यानं त्यांना किती वाईट वाटलं असेल, याची कांहीं कल्पना केलीस का ? दुसऱ्यानीं तुमच्या उपयोगीं कां पडावं ? त्यांच्या चांगुलपणाचं चीज करायची बुद्धी तुला ईश्वर देत नाहीं का !

**जगन्नाथ**—आई, या बाबतींत मी सर्वस्वीं अपराधी आहें. पण काय करूं? माझा नाइलाज आहे. मी निर्दोष आहें पण तसा पुरावा मला पुढं आणतां येत नाहीं.

**बाबाजी**—कां आणतां येत नाहीं ? जगू, कुणावर पांघरूण घालायचा तुझा प्रयत्न चालला आहे ? कुणासाटीं तूं एवढा जिवावर उदार झाला आहेस ?

स्वत:च्या गळ्याला फांस लावून घेऊन एवढया कुठल्या पुण्यवंताचा प्राण वांचवतो आहेस ?

**बायजा**—उगी कां राहिलास ? काय विचारलं तें ऐकूं आलं नाहीं का तुला ? जगूबाळ कुणा सभाग्यासाठीं माझा कुसवा कोरडा करायला तयार झाला आहेस, तें सांग ना त्यांना !

**जगन्नाथ**—कुणाचाही प्राण बचावण्यासाठीं मी जिवावर उदार झालों नाहीं.

**बायजा**—कशासाटीं तर मग ?

**जगन्नाथ**—तें मला सांगतां येत नाहीं.

**बायजा**—जगू, जगू, काय करतो आहेस हें ? कारणाशिवाय कां मरण ओढून घेतोस ? तुझं तुला काहीं वाटत नसलं तरी या दीनदुबळ्या आईबापांसाठीं तरी असा अविचार करूं नकोस.

**जगन्नाथ**—आई, मी दुर्दैवी आहें या जन्मीं तरी तुम्हांला सुख द्यायचं माझ्या नशिबीं नाहीं. चांगला शिकेन सवरेन, नांवालौकिकाला येईन, बाहेर काबाडकष्ट करावे लागले तरी तुम्हांला देवासारखीं घरांत बसवून ठेवीन, असं किती किती माझ्या मनांत होतं ! सारा जन्म क्लेश काढणाऱ्या माझ्या आईला रुजाम्यावरून फिरवीन म्हणून किती सुखस्वप्नं मी आंखून ठेवलीं होतीं ! स्वप्नंच तीं—तीं खरीं कशीं होणार ?

**बाबाजी**—तूं खरं बोललास तर—

**जगन्नाथ**—मी खोटं बोललों नाहीं.—आणि प्राण गेला तरी मी कोर्टात खरं सांगणार नाहीं.

**शिपाई**—टैम झाला-चला-निघा.

**बायजा**—शिपाईबुवा, मी आई आहें त्याची.

**शिपाई**—बाई, मी हुकुमाचा नोकर आहें. नोकराला दयामाया नसते बाई.

**बायजा**—कोण तुम्ही ? तुमचा चेहरा मला ओळखीचा वाटतो.

**शिपाई**—सरकारी नोकराची कसली ओळख शोधतां ? मी इथला पहारे-

करी आहें आणि वरिष्ठांच्या हुकमाप्रमाणें मला वागावं लागतं. ओळखीचा असतों तरी मी अधिक काय करणार होतों ? चला बाई—चला राव—चला

**बायजा**—जगू, तूं नाहीं ना मला सांगत ? कोर्टात सांगूं नकोस निदान मला सांग.

**जगन्नाथ**—आई, आतां देवाकडे पहा–माझ्याकडे पाहूं नकोस–पाठ फिरीव आणि पुन: इकडे वळूं नकोस. जा–तुझा मुलगा मेला आहे—त्याला परत जिवंत करणं ईश्वराखेरीज दुसऱ्या कुणाच्या हातीं नाहीं.

**शिपाई**—चला. बस्स करा. ( बाबाजीरावाला हाताला धरून ओढतो. बायजा खिडकींतून हात घालून जगन्नाथाला कवटाळते. दोघें ओक्साबोकुशीं रडत मिळ्या सोडवून जातात. )

**जगन्नाथ**—मस्तक कसं भणभणतं आहे ! जितका विचार करावा तितके त्याला अधिक फांटे फुटत आहेत. मंजुळाबाईकडे काय बोलणों, आईला काय उत्तरं दिलीं, याचा पडताळा घालूं लागलों तर माझं मलाच कांहीं समजत नाहींसं होतं. मन कसं चोहींकडून फाटून गेलं आहे. पुन: पुन: वाटतं. कीं झाली हकिकत सांगून टाकावी. पण त्या माऊलीची अब्रू–नको तो विचार. देवाचं नांव घेऊन एकदां तोंडाला मिठी घातली आहे, ती तशीच दाबून ठेवली पाहिजे. ( स्वस्थ बसतो. शिपाई नागोजीरावांना घेऊन येतो )

**नागोजी**—जगन्नाथ–

**जगन्नाथ**—( तिरसटपणानें ओरडून ) मला स्वस्थ सुद्धां बसूं देत नाहींत.

**नागोजी**—जगन्नाथ, मी नागोजीराव सुभेदार–

**जगन्नाथ**—माफ करा सुभेदार साहेब. माझं डोकं ठिकाणावर नाहीं.

**नागोजी**—डोकं ठिकाणावर कसं असेल ? गळयाला फांस लागायची वेळ आली असतां कुणाचं डोकं ठिकाणावर राहील ? मृत्यूची भीती सर्वांनाच वाटते. पण मृत्युला न भिणारी एक व्यक्ति आहे आणि ती म्हणजे छाती पुढें करून रणांगणावर लढणारा शिपाई. मृत्यू हाच आम्हां शिपाईगड्यांचा पाठिराखा असतो. आम्हीं मराठ्यांचे बच्चे मृत्यूला पाठीशीं घालून लढाईला तोंड देत असतों.

**जगन्नाथ**—मीही मराठ्याचा बच्चा आहें.

**नागोजी**—म्हणूनच तुला सांगतों आहें. पण आम्हीं शिपाईगडी लढाईवर जातों त्यावेळीं मृत्यूला विसरतों. इतर वेळीं नुसते तापानं आजारी पडलों तरी आम्हांला मरणाची भीती वाटते. जगू, तूं कोणत्या लढाईवर निघाला आहेस ?

**जगन्नाथ**—मी कोणत्या लढाईवर निघालों आहें ? सुभेदारसाहेब, मरणाची भीती मला वाटत नाहीं, यावरून मी लढाईवर निघालों आहें एवढं तुम्हांला पटेल. पण मी कोणत्या लढाईवर चाललों आहें तें मला सांगतां येत नाहीं.

**नागोजी**—माझं शिपायाचं मन सांगतं, कीं तूं निर्दोषी आहेस. खुनी माणसाची चर्या मला ओळखतां येते. तुझा चेहरा तसा नाहीं. लढवय्या वीराचं तेज तुझ्या तोंडावर झळकतं आहे, मग हें असं कां ?

**जगन्नाथ**—असं तें काय ?

**नागोजी**—तूं निर्दोषी आहेस तर कोर्टात तसं कां सांगितलं नाहींस ?

**जगन्नाथ**—मी तसंच कोर्टात सांगितलं.

**नागोजी**—नुसता निर्दोषी आहें, एवढंच सांगितलंस. पण त्याची कारणं मी पाठविलेल्या वकिलाला सुद्धां सांगितलीं नाहींस. जगू, तुला फांसावर चढवण्यासाठीं का मी वकील दिला होता ?

**जगन्नाथ**—सुभेदार साहेब, मी तुमचा सर्वथैव ऋणी आहें पण एवढा प्रश्न मला करूं नका.

**नागोजी**—अशानं माझं कसं समाधान होईल ? जगू, तुला वांचवायचा मीं प्रयत्न करतों आहें, यांत तुझ्या लोभाइतकाच माझा स्वार्थ आहे. माझ्या मुलीचा भावी नवरा निर्दोषी ठरावा एवढाच माझा तो स्वार्थ. त्यांत कसलं कुणाचं ऋण ? तुझा हट्टच असेल तर मी तुला पुन: विचारणार नाहीं. अजून विचार कर. अजून अवकाश आहे. केस नुसती सेशन कमिट झाली आहे. तूंही कुठं जबानींत गुंतलेला नाहींस. अजून सर्व हकिकत सांगशील तर तुला सोडवण्याचा प्रयत्न करतां येईल.

**जगन्नाथ**—आतां मला सोडवणं फक्त ईश्वराच्या हातीं आहे.

**शिपाई**—सुभेदार साहेब, तुम्हांला कुणी बोलावतं आहे.

**नागोजी**—समजलों. मी परवानगी घेतली आहे. तिला इकडे पाठवून दे.

**जगन्नाथ**—कोण ? चिमणा ? —तिला हें तोंड कसं दाखवूं ?

**नागोजी**—मराठ्याच्या बच्च्या, लढाई खेळणारानं अशी ऐन वेळीं कच खातां नये. ( चिमणी येते ) राम राम—जगू—राम राम. चिमू, बाळ, मी बाहेर तुझी वाट पाहातों आहें. ( जातो. )

**चिमणी**—काय केलंत हें ? माझी सुद्धां तुम्हांला त्या वेळीं आठवण झाली नाहीं का ?

**जगन्नाथ**—चिमणा, मी निरपराधी आहें—तुझ्या इतकाच मी निर्दोषी आहें. तुझी आठवण होती म्हणूनच माझ्या हातून केव्हांही अविचार घडला नाहीं. तुझ्या आठवणीच्या बळावरच मरणप्राय अपमान सहन करण्याचं मला धैर्य येत होतं. तुझ्या आठवणीच्या बळावरच आज मी तुरुंगवास पत्करला आहे आणि उद्यां कदाचित फांसावरही लटकणार आहें.

**चिमणी**—मला पोरीला हें तुमचं भाषण कसं कळावं? मी एक फक्त तुमच्यावर दृष्टी ठेवून बसलेली आहें. एक वर्षानं सुट्टन आल्यावर आपण सुखी होऊं म्हणून शेताच्या बांधावर बसून आपण नाहीं का कुजबुजलों ? मग माझा असा विश्वासघात कां केलात ? तुमच्या जिवावर तुमचा हक्क नाहीं, तो माझा झाला होता. एके दिवशीं तुम्हीच नाहीं का असं म्हटलं ? आणि आतां हें काय केलंत ? कशासाठीं ?

**जगन्नाथ**—चिमू, आज ना उद्यां मी मरणार—निदान कांहीं वर्षे काळ्यापाण्यावर जाणार. त्यापूर्वी—काय करूं ? बोलूं का ?

**चिमणी**—बोला—बोला—माझ्या गळ्याची शपथ आहे. एकदां मन मोकळं करून बोलाच-

**जगन्नाथ**—सर्वांना चकवण्याइतकी चलाखी दाखवण्याइतकं मनोबल मी आतांपर्यंत ओढून आणलं. पण चिमणे, तूं समोर येतांच माझा धीर खचला. चोरट्या जिभेला वाचा फुटूं लागली. कोणत्याही प्रकारानं मी जगाच्या दृष्टीआड झालों तर माझं रहस्य माझ्याबरोबरच नाहींसं होईल. माझ्यामागं माझी निर्दोषिता

प्रतिपादन करून सांगायला कुणी तरी पाहिजे. चिमणे, माझ्या गळ्याची शपथ घे. सुभेदारसाहेबांना सुद्धां मी हयात असेपर्यंत ही गोष्ट सांगणार नाहीं, अशी शपथ घे.

**चिमणी**—नाहीं. तुमचा प्राण संकटांत असतां-तुमच्या विनंतीसाठीं—अगदीं या वेळच्या विनंतीसाठीं सुद्धां मी शपथ घेणार नाहीं !

**जगन्नाथ**—शपथ घेतल्याशिवाय मी कांहीं सांगणार नाहीं.

**चिमणी**—मग कांहींच सांगूं नका तर. माझ्या मनाचं एक समाधान झालं. माझं मन मला सांगत होतं, या सगळ्या प्रकारच्या मागं कांहीं तरी गुपित आहे. कोर्टांत जेव्हां जेव्हां मी तुमच्याकडे पहात होतें. तेव्हां तेव्हां तुमच्या ओंठाची चळवळ मला स्पष्ट दिसत होती. शब्द ओंठावर येत होते पण तुम्हीं निर्धारानं ते दाबून टाकित होतां. जिवाची भीती आणि प्राणाचं संकट डोळ्यांपुढं दिसत असतांना सुद्धां, कुणा भाग्यवानासाठीं हें साहस करतां आहांत, तें तुमचं तुम्हांला माहित कीं एक ईश्वराला माहित ! मला माहित नाहीं पण मला कळतं आहे—कीं तुम्हीं खून केला नाहीं–खूनाचा प्रयत्नही केला नाहीं. रक्तानं माखलेल्या हातांचा रंग निराळा असतो—हातनं सांडलेलं रक्त पाहिलं असलं म्हणजे त्या डोळ्यांची टक भेसूर होते. तुमची तशी झाली नाहीं.

( **गझल.** )

**भालीं विषाद भरला नयनीं कळा निराळी।**
**आली विकारवशता सारी दया विराली ॥**
**बंदीं हताश झाला । जरि कावला जिवाला।**
**नाहीं गुन्हा तयाला । ना लाज येइ गालीं ॥**
**संचार बंधनाचा । जरि बांधिल्या पदांचा।**
**स्वातंत्र्य अंतरींचें । राहूं न देइ खालीं ॥**

तुम्हीं निर्दोषी आहांत, ही माझी खात्री आहे; पण—

**जगन्नाथ**—शपथ घेत असशील तर अजूनही माझी हकिकत तुला सांगेन. तें ओझं मला जड झालं आहे ! काळीज फोडून जिभेवाटे शब्द केव्हां बाहेर

जातील याची भीती वाटूं लागली आहे. कुठं तरी एकदां सांगून टाकावं असं वाटतं-आणि कुठं तरी म्हणजे एकच जागा. तुझ्याजवळ-आणि तूं तर-

**चिमणी**—शपथ घेणार नाहीं.

**जगन्नाथ**—होय. शपथ घेत नाहींस!—माझं रहस्य माझ्याबरोबरच नाहींसं व्हावं अशीच जर ईश्वराची इच्छा असेल—

**चिमणी**—होय-ईश्वराची तशीच इच्छा आहे.

**जगन्नाथ**—कुणी सांगावं? काय होईल कुणी सांगावं? देवाच्या गारुडी खेळांत माणसाच्या बुद्धीला वाव नाहीं.

**चिमणी**—आणि माणसाच्या दुराग्रही खेळांत प्रेमाला ठाव नाहीं.

**जगन्नाथ**—तसं म्हण-तसंही म्हण हवं तर, मी आतां निर्दय झालों आहें. —दगड झालों आहें: माझ्या वृत्ती बधिर झाल्या आहेत. प्रेमाचा खून पडला, दयामाया पार गेली—स्वतःच्या प्राणावर सुद्धां आतां दयामाया राहिली नाहीं. एक जीव मरतांना पाहिला—आतां मी निढावलों आहें. कुणाचाही आतां मी खून करीन—तुझासुद्धां खून करीन! माझा खून मी करतोंच आहें कीं नाहीं! आतां दुसऱ्या कुणाच्या खुनाची मला काय पर्वा! तुला पाहिलं—तुझ्या डोळ्यांतलीं आसवं पाहिलीं आणि मी माझ्या निर्धारापासून डळमळत होतों.—तूंच मला सांवरलंस. I thank you for it. इंग्रजी बोललों म्हणून अशी पाहूं नकोस. दुबळ्या भाषेला जोर आणायला इंग्रजी शब्दच बरे. हुंदके कशाला देतेस? रडायचं इथं काम नाहीं. तुरुंगांत रडूं नये—इथं रडायची बंदी आहे. इथं दगड बनावं लागतं! दगडाला पाझर नसतो—ऐकलंस? दगडाला पाझर नसतो. इथं रडूं नये—समजलीस?—इथं टिपं गाळूं नयेत! ही जागा मोठी पवित्र आहे. पापी जीव इथं स्वतःशीं बोलत असतात—जीवाला जागवित असतात—देवाला आळवीत असतात. देवाजीवाची भेट इथं क्षणभर तरी घडत असते. इथं उघडं व्हावं लागतं—माणसाशीं नव्हे—देवाशीं!—समजलीस? तूं शपथ घेऊं नकोस. तूं शपथ घेतली असतीस तर माझ्या हातून पाप घडलं असतं. बरं केलंस. माझा बचाव केलास. देवाशीं प्रतारणा झाली असती ती वाचवलीस. मोठे उपकार झाले.

जा आतां. जा. मला जरा स्वस्थ बसूं दे. देवाशीं दोन शब्द बोलूं दे. जगलों वाचलों तर पुन्हा भेट—पण आतां कुठलं जगणं ? जगलोंच तर कुठं ? काळ्या-पाण्यावर!—जा-जा आतां. दृष्टीसमोर राहूं नकोस. माझी बुद्धी भ्रष्ट करूं नकोस. ( चिमणी रडत रडत जाते ) गेली. प्रेमाची वात मालवली. आतां अंधार—चोहींकडे गुडुप अंधार ! दशदिशा व्यापून टाकणारा घनघोर अंधार.

( लोणी—त्रिताल. )

**दिसलि न तव दया मातें देवा ।**
**हे सदया ! कां ? ॥ धृ ॥ प्राणदिवा**
**तिमिरा घरिं गेला । अणुभरि**
**घडली न सेवा ॥ १ ॥**

आतां एकच प्रकाशाचा किरण—एकच—अगदीं एकच लहानसा—चिमकुला-प्रकाशाचा किरण—देवाची दया !

**शिपाई**—( हळूच ) जगू-जगन्नाथ—

**जगन्नाथ**—( एकदम दचकून ) कोण ? कोण ? तुम्हीं ?

**शिपाई**—चूप—हळू बोल. मला ओळखलं नाहींस ?

**जगन्नाथ**—ओळखणारे डोळे कुठं आहेत आतां मला ?

**शिपाई**—मी-पांडू निकम. तुमच्या घरीं मीं गुराखी होतों. तुमच्या अन्नावर मी लहानाचा मोठा झालों. ( हळूच ) मी ऐकलं—सर्व कांहीं ऐकलं. पाहा—ऱ्याच्या फेरीगणीक तुझे शब्द माझ्या कानीं पडत होते. किती मोठ्यानं बोलत होतास ?—थांब मी आंत येतों ( दार उघडून आंत येतो ) आतां असं कर, ही दोरी घे. माझे हात बांध-असा काय डोळे फाडून पाहातोस ?—माझे हात पाय बांध-चांगले करकरून बांध हा बोळा दे माझ्या तोंडात आणि ही बंदूक घेऊन बाहेर निघ. अगदीं विचार करूं नकोस-नाहीं म्हणूं नकोस. तुला तुझ्या आईची शपथ आहे-तुझ्या गुपिताची शपथ आहे !—डाव्या बाजूनं वळून समोरच्या दिंडीनं बाहेर निघ आणि तडक कंपौण्डांत जाऊन तटावरून उडी घे. जा, कुठं तरी जा—गोव्यांत जा. तिथं घेऊन जा आपल्या आईबापांना-त्यांचे अनंद

उपकार आहेत माझ्यावर. तोंडांतून एक शब्द काढूं नकोस. अगदीं मी सांगतों तसं कर. कांहीं व्हायचं नाहीं मला. कसा बेमालूम निसटतो तें तुला पुढं कळेल. असं काय पाहातोस ? देव बोलतो आहे माझ्या तोंडावाटे !—आतां विचार करूं नकोस. येईल कुणी तरी ! ( जगन्नाथ त्यानें सांगितल्याप्रमाणें करतो व बंदूक घेऊन जातो ) [ बांधलेला शिपाई कांहीं वेळ पडून राहातो व नंतर जोरजोरानें धडपड करूं लागतो. कांही शिपाई आंत येतात व या शिपायाला सोडवित असतां पडदा पडतो. ]

पडदा

# अंक चवथा

## प्रवेश पहिला

( रघोजीरावाचे घर. )

( यादवराव व नागोजीराव प्रवेश करतात. )

**यादवराव**—ही तुमची संस्थानी दिरंगाई और आहे, यांत शंका नाहीं. हीं काय कोर्ट कीं खेळ ! कांहीं दाद ना पत्ता. सारं कांहीं धिमेधिमे चाललं आहे.

**नागोजी**—त्याला काय उपाय आहे ? हें आमचं स्वराज्य आहे. आम्हीं मिलिटरी लोक साहेबांची तरफदारी करतों म्हणून आम्हांला नांवं ठेवतात पण हे असले संस्थानी कारभार पाहिले, कीं आमचं ब्रिटिश राज्यच बरं असं वाटूं लागत.

**यादवराव**—आतां हें पहा. तिकडे बिहारमध्यें धरणीकंप झाला आहे. तिथल्या कामगिरीवर मला गेलं पाहिजे. तिकडून केव्हां येतां येईल याचा नेम नाहीं, म्हणून काल तारीख वाढवून घेतली—तर आज हा जगूच कोठडींतून पळून गेला म्हणून कळलं.

**नागोजी**—काय म्हणतां, जगू तुरुंगांतून पळाला ?

**यादवराव**—असं कोतवालांनीं मला सांगितलं. काल रात्रींपासून सारखा पाठलाग सुरू आहे पण अजून पत्ता लागला नाहीं.

**नागोजी**—जगू पळाला ? मराठ्याचा बच्चा तुरुंगांतून पळाला ?

**चिमणी**—( प्रवेश करून ) कळलं बाबा ?—

**नागोजी**—हो कळलं—जगू तुरुंगांतून पळाला. हें बरं झालं नाहीं !

**चिमणी**—कां बरं झालं नाहीं ? इथं काय न्याय मिळणार होता ? मुलुख-गिरीचं वाण घेऊन निघून जाईल तर परदेशांत मराठ्याचं नांव उजळ करील. मी देखील जाईन तिकडे त्याच्या मागनं—

**नागोजी**—मूर्ख आहेस ! हे यादवराव काय म्हणतील ? ‘ मराठ्याचा मुलगा ’ मरणाच्या भीतीनं पळून गेला ! नाहीं—फांशीं गेला तरी हरकत नाहीं—

**चिमणी**—बाबा !—

**नागोजी**—हो—हो. फांशीं गेला तरी हरकत नाहीं. पण मराठ्याचा मुलगा भेकड ठरतां कामा नये.

**यादवराव**—खरं आहे. हें मराठ्याचं ब्रीद नव्हे. आतां मी उद्यां बिहारांत जाणार आहें. अजून तिथं धरणीकंप सुरू आहेत. मरण अगदीं नजरेसमोर आहे. तरीही जाणार आहें. कां ?

**चिमणी**—भेकड म्हणून ! तुमची प्रतिष्ठा नको. तुमचं धैर्य मी जाणतें. जगूला पकडून देणारे तुम्हीं. त्यावेळीं मराठ्याचं धैर्य कुठं गेलं होतं ?

**यादवराव**—मराठ्याचा बाणा होता म्हणूनच जगूला पकडून दिला. मराठा दिलदार असतो, तसाच सच्चाही असतो.

**चिमणी**—तोंड तर पाहा सच्चा मराठ्याचं ! कोर्टांत कां कांचकत होतां ? माझी खात्री आहे, या प्रकाराचं रहस्य तुम्हांला माहित आहे. तुम्हीं कांहीं तरी लपवतां आहां—बोला, लपवतां आहां कीं नाहीं ?

**यादवराव**—कोण-कोण-कोण म्हणतो मी लपवतों म्हणून ? काय केलं मी ? कांय माझी चूक आहे ? मी खरं तेंच सांगितलं—अगदीं ईश्वरसाक्ष—

**चिमणी**—चूप-ईश्वराचं नांव कशाला घेतां ? तुमचं तोंडच सांगतं आहे. जीभ कां अशी चमकते ?—बोला—कुणी गोळी घातली रघोजीरावांना ?

**यादवराव**—तूं कोण मला विचारणार ? जें कांहीं सांगायचं तें मी कोर्टांत सांगितलं आहे. सुभेदारसाहेब, तुम्हीं स्वस्थ ऐकतां आहांत ? हा फाजिलपणा तुम्हांला आवडतो का ?

**नागोजी**—तिच्या म्हणण्यांत कांहीं तथ्य आहे, असं मलासुद्धां वाटतं. खरं सांगा, जगूनंच गोळी घातली का ?—तुम्हीं पाहिली का ?—गोळी अजून कोर्टा-समोर आली नाहीं—पण मला कळलं आहे, कीं ती गोळी बंदुकीची नाहीं—

**यादवराव**—कोण म्हणतो असं ?

**नागोजी**—तें मला माहित नाहीं. मी नुसतं ऐकलं. कदाचित खोटंही असेल. पण हें पिस्तुल कुठून आलं ?

**यादवराव**—तें आतां न्यायाधीशच ठरवतील. मला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. माझं सारं लक्ष यावेळीं बिहारकडे लागलं आहे. अशीं हजारों निरपराधी माणसं अन्नाअभावीं तडफडत असतां एका गुन्हेगाराची कींव करीत बसायला मला वेळ नाहीं. ओळखदेख ठेवा. पुनः आलों तर भेट होईलच. ( जातो. )

**चिमणी**—घाबरला खास ! यांत कांहींतरी पाणी मुरतं आहे. ( हुंदका येतो ) बाबा—बाबा कुठं गेला असेल तो !

**नागोजी**—तुला काय सांगितलं त्यानं ?

**चिमणी**—मी शपथ घेतली नाहीं. कशी शपथ घेऊं ?—त्याचा जीव धोक्यांत असतांना शपथ कशी घेऊं ?

**नागोजी**—कसली शपथ ?

**चिमणी**—ते कांहीं तरी लपवून ठेवताहेत. मी शपथ घेतली असती–कुणाला सांगणार नाहीं असं कबूल केलं असतं—तर मला त्यांनीं सांगितलं असतं. मी शपथ घेतली नाहीं—आणि त्यांनींही आपलं तोंड बंद ठेवलं.

**नागोजी**—म्हणून या यादवरावाला असं विचारलंस ?

**चिमणी**—होय बाबा—मला संशय आला—उगीच अंदाज घ्यावा असं वाटलं—म्हणून खडा टाकून पाहिला—पण तो लागला खास. चेहेरा कसा उतरला पाहिलात ?

**नागोजी**—तेंच मी पाहिलं. ही पिस्तुलाच्या गोळीची काय बातमी आहे याचा तपास लावला पाहिजे—जगू सुटणार—माझं मन सांगतं जगू सुटणार—

**चिमणी**—सुटलाच आहे—

**नागोजी**—ती कसली सुटणूक ? तसं नको व्हायला. चोराचं जिणं—तोंड लपवून दिवस काढायचे !—नाहीं पोरी, त्याला गांठलं पाहिजे—

**चिमणी**—कसं गांठणार ? पोलिसांना सुद्धां पत्ता लागला नाहीं, तिथं आम्हांला कसं यश येणार ? काय करूं बाबा, मन कसं बावरून गेलं आहे. सोन्याचा घास

ओंठीं आला पण पोटीं गेला नाहीं. असं वाटतं, बरं वाईट ऐकण्यापूर्वी कुठंतरी जाऊन जीव द्यावा—

( **देसकार**--त्रिताल )

**अणुभरि जिव जगला माझा । आस**
**विफलता जाळि हृदय जरि**
**कठिण शांत मनिं विरह साहिला ॥ धृ ॥**
**दिसत विषमया विषमा छाया**
**घोर कालगति नाश निरखिला ॥ १ ॥**

**नागोजी**—चल. एकदां रघोजीच्या घरीं जाऊं. त्याच्या बायकोची गांठ घेऊं. तिला कांहीं अंदाज असेल—पण चिमणे, माझं मन सांगतं—जगू सुटणार—खास निर्दोषी होऊन सुटणार—

( जातात )

---

## प्रवेश दुसरा

( रघोजीरावाचा दिवाणखाना )

( लहानू गाणें म्हणत बसला आहे )

**लहानू**—

**गाणें**–( कवि 'यशवंत' यांचें )

**न्यारिचा वखुत होईल । मैतरणी बिगिबिगि चाल ॥**
**नदरे न पडन मी जरी । जाईल मार्जि ग तरी ।**
**उरिं रुतल माझ्या सुरी । नग नग गमावूं येळ ।**
**मैतरणी बिगिबिगि चाल ॥**

( इतक्यांत कांहीं पडल्याचा आवाज होतो )

**लहानू**—( ओरडून ) धरणीकंप !—धरणीकंप ! ! ( रघोजीराव आंतून बाहेर येतो व त्याचा हात धरतो ) भूत ! भूत ! ! धांवा !—( रघोजीराव त्याच्या तोंडावर हात देतो. )

**रघोजी**—चूप रहा—ओरडशील तर गळा दाबून ठार मारीन. (हात सोडतो) ती कुठं आहे ?

**लहानू**—भाइर गेल्याती.

**रघोजी**—कुठं ?

**लहानू**—बाबाजीरावाच्या घरला !

**रघोजी**—यादवराव कुठं आहेत ?

**लहानू**—धरणीकंप !—त्येंचा होतुया धरणीकंप !

**रघोजी**—धरणीकंप ? कसला धरणीकंप ?

**लहानू**—थत पाटणास धरणीकंप झालया न्हव का ?—ह्ये पाटण–आपल्या कराडा लगतचं—मोरगीर पाटण—थत झालया धरणीकंप—थत जात्याती आजउंद्यां.

**रघोजी**—असं ? ते जाणार आहेत ? कुठं आहेत ते ?

**लहानू**—ठेसनावर गेल्याती गाडी बगाया. आतां इक्त्यांत येत्याल.

**रघोजी**—ती केव्हां येईल ?

**लहानू**—तें म्यां कसं सागावं जी ? इक्त्यांत येत्याल न्हाइतर घटकाभऱ्यानं येत्याल—न्हाइतर पाराभऱ्यानंबी येत्याल. कवां जात्याती अन् कवां येत्याती त्येचा मागच न्हाइ. दावं सुटल्या पाडींवानी भटाकत्याती.

**रघोजी**—असं ? ठीक. आतां असं कर. गप बसून रहा. कांहीं बोलूं नकोस ती आली तर !—नाहीं—तुझं तोंड राहाणार नाहीं. तूं इथून जाच कसा—लांब शेतावर जा—आणि मी बोलावल्याशिवाय येऊं नकोस. ( दार वाजतें. ) कडी काढ जाऊन—मी कडी लावली होती—जा कडी काढ आणि निघून जा. ( लहानू ‘ जी ’ म्हणून जातो. रघोजी लपतो. बायजा व मंजुळा बोलत बोलत प्रवेश करतात. )

**मंजुळा**—प्राण गेला तरी आतां मी इथं राहायची नाहीं. कुणी कांहीं वाटेल तें सांगितलं, तरी माझ्यावर त्याचा परिणाम व्हायचा नाहीं.

**बायजा**—काय हा आततायीपणा ? माझं दुःख गिळून मी तुमच्यामागं धावत आलें, ती एवढ्यासाठींच का ? माझ्या पोराच्या गळ्याला फांस लागलेला पण तुमच्यापायीं मन ओढलं—तो माझा मुलगा तशीच तूं मुलगी, असं वाटलं-पोराची अब्रू गेली पण पोरीचं नांव तरी खराब होऊं नये म्हणून अशी धावलें—

**मंजुळा**—कशाला धावलांत ? काय तुमच्या हातीं आहे ? पोटचं पोर राखतां येत नाहीं, तीं दुसऱ्याचीं पोरं संभाळणार म्हणे ! मी कां जाऊं नये निघून ?

**बायजा**—घराण्याच्या अब्रूसाठीं.

**मंजुळा**—कसली अब्रू नि कसलं घराणं ! तिळातिळानं जीव जळतो आहे हरघडीला—तिथं कुणाच्या अब्रूची चाड बाळगायची ? माझं सुख कोण पहातं आहे ?

**बायजा**—स्वतःचंच सुख पाहून चालत नाहीं. थोडी दुसऱ्याकडेही नजर दिली पाहिजे. आज तुम्हीं घर टाकून गेलांत तर पुढं तुम्हांला सुख होईल अशी खात्री आहे ?

**मंजुळा**—नसेना का खात्री ! सुख झालं कीं दुःख झालं तरी माझी मी त्याला जबाबदार. हें दुसऱ्याच्या अरेरावीचं जिणं आतां पुरे झालं. आतां ते परत येतील आणि ते परत आले कीं माझा तुरुंगवास सुरू झाला. तें कांहीं नाहीं-मी जाणार—एकदां जो निश्चय केला तो केला—ते यायच्यापूर्वीं मी हें गांव सोडणार—आणि —नापत्ता होणार !

( **हिंडोल**-एकताला )

**नाहिं दयिता मी । नच कुणा पतिची कांता**
**विधियुता ॥ ध्रृ ॥ तुटलि सकल माया ।**
**हटलि विकल काया । दिगंता वरिन**
**मी आतां ॥ १ ॥**

**बायजा**—वेडे पोरी, असा अविचार करूं नकोस. एकदां अब्र गेली कीं गेली—

**मंजुळा**—जळो ती अब्रू—या अब्रूपायीं अजुन मरत राहिलें याचं काय सार्थक झालं ? एक बिचारा गरीब जीव आज फांसाची दोरी बघत राहिला आहे.

यापूर्वींच गेलें असतें तर कशाला हा प्रसंग आला असता? जा—निघा—चला इथून—कुणाचाही उपदेश मला ऐकायचा नाहीं.

**बायजा**—विचार करा—विचार करा—माझं ऐका—अविचारानं कधीं कुणाचं कल्याण झालं नाहीं.

**मंजुळा**—माझं कल्याण व्हायला नको!—कळलं—जा आतां. कांहीं उपकारच करायचे असतील तर एवढं करा, मी गेल्यावर दोन दिवस कुणाला माझी हकिकत सांगूं नका.

**बायजा**—ती कशी लपून राहाणार? लहानु आहे ना इथं?

**मंजुळा**—मी आधींच त्याला गांवीं पाठविणार आहें—त्यांच्या खबरीला—थांबा—ते निघाले आहेत तें मला कळलं आहे—पण त्याला नाहीं माहित. त्याला पाठवून देईन आणि मग मी काळं करीन. जा पाहूं आतां—अगदीं निर्धास्त जा—मी गेलें कीं तुमचा जगू सुटलाच म्हणून समजा.

**बायजा**—तो कसा?

**मंजुळा**—जा आतां. मला कांहींसुद्धां विचारूं नका. जा—जा—जा. (तिला लोटून दाराबाहेर घालवते. दुसऱ्या दारानें यादवराव येतो) आलांत? तिकिटं रिझर्व केलीं? सेकंड क्लासच ना? थर्ड क्लासांत नकोत तीं माणसं भेटायचीं. आतां केव्हां निघायचं?

**यादव**—आतांच. मी सारी तयारी करून ठेवली आहे. मला वाईट वाटतं तें एवढ्यासाठींच, कीं तुला मुंबईला सोडून देतांच मला बिहारला जावं लागणार आहे—

**मंजुळा**—त्याचाच मला आनंद होतो आहे.

**यादवराव**—असं कां म्हणतेस?

**मंजुळा**—तुमच्या पकडींतून सुटण्यासाठीं.

**यादवराव**—मी माझं काम सोडीन—मुंबईंत तुझ्याबरोबर राहीन.

**मंजुळा**—अन्नासाठीं तळमळणारे बिहारचे दुर्दैवी जीव टाकून?

**यादवराव**—माझ्या प्रेमापुढं बिहारचा अनर्थ मला काय होय?

**मंजुळा**—हाच का तुमचा ग्रामोद्धार ?

**यादवराव**—ती एक नोकरी आहे ! एक नोकरी सोडली तर दुसरी धरतां येईल पण प्रेमाचा उगम मात्र एकदांच होत असतो. ही वावटळ केव्हांच निघून जाईल—

**मंजुळा**—असल्या माणसावर माझं प्रेम बसेल असं तुम्हांला वाटतं ? यादवराव, समजा—मी उद्यां तोंड उघडलं—

**यादवराव**—चूप !—

**मंजुळा**—भेकड !—ऐका, मी उद्यां तोंड उघडलं—तुम्हीं त्यांना गोळी घातली असं सांगितलं—

**यादवराव**—खोटंच ?

**मंजुळा**—खोटंच कां ? मी माझ्या डोळ्यांनीं पाहिलं. त्यांनीं जगूवर बंदूक रोखली—तुम्हीं पिस्तुल उचललं—आणि घोडा दाबला !—घाबरट !—मी पाहिलं—अगदीं स्वच्छ पाहिलं—जगून पाहिलं नव्हतं—तुमच्या हातचं पिस्तुल मी काढून घेतलं—कां घेतलं देव जाणे !—

**यादवराव**—माझ्या प्रेमासाठीं—नकळत—अगदीं नकळत तुमच्या प्रेमानं माझा बचाव केला !—

**मंजुळा**—चूप म्हणतें ना !—जगूनं तें पिस्तुल माझ्या हातांत पाहिलं. त्याला वाटलं मी गोळी घातली. म्हणून तो उगी राहिला—माझ्यासाठीं तो फांसावर चढतो आहे—कळलं ?—पण ते बरे झाले आहेत ! आजच मला कळलं, कीं ते बरे होऊन येताहेत. त्यापूर्वी मला गेलं पाहिजे म्हणून मी घाई करतें आहें—

**यादवराव**—असं का ?

**मंजुळा**—आतां जगू फांसावरून उतरला. थोडी शिक्षा होईल फार तर. माझा जीव आतां खालीं पडला म्हणून मी घाई करतें आहे. ते यायची भीति आहे—जगू यायची भीति नाहीं—( खिडकी वाटे जगन्नाथ येतो. )

**जगन्नाथ**—भीति नाहीं कशी ? आई—आई !

**मंजुळा**—जगू !—

**यादवराव**—जगन्नाथ !—

**जगन्नाथ**—आई ! पुनः तेंच.

**मंजुळा**—होय. मी तुला तुरुंगांतच नाहीं का सांगितलं ?

**जगन्नाथ**—पण याच्याबरोबर ?

**मंजुळा**—तिथं मात्र चूक झाली. मी मूर्ख आहें—समजलास जगू, नवऱ्याच्या जाचाला कातावून माझी बुद्धी भ्रष्ट झाली आहे—

**जगन्नाथ**—अभिमान मिरवीत नाहीं—पण आई, मी एवढा जिवावर उदार झालों तो यासाठीं का ? तुझ्या अब्रूसाठीं मी जिवावर उदार झालों. ती माझी ठेव आहे—ती माझी ठेव तूं बेइमानपणें झुगारून देणार होतीस ?

**मंजुळा**—नाहीं जगू—पण मला गेलं पाहिजे !

**जगन्नाथ**—या बेरडाबरोबर ?

**यादवराव**—कोण आहे तिला आतां माझ्याखेरीज ?

**जगन्नाथ**—आहे—तो—तो सर्वसाक्षी परमेश्वर ! (यादवराव हंसतो) हंसूं नकोस ! याचवेळीं माझी कां सुटका झाली ? मी पळून आलों त्यावेळीं माझं मन खात होतं—हा भेकडपणा होतो आहे असं मला वाटत होतं—पण मनांतलं मन मला पुढं हांकीत नेत होतं. कालची रात्र आणि आजचा दिवस मी गवताच्या गंजींत लपून काढला. त्या आईला सुद्धां भेटायला गेलों नाहीं—पण इथं आलों—इथंच यावं असं वाटलं ! कां ? मला नकळत परमेश्वर मला मार्ग दाखवीत होता. तोच तिलाही मार्ग दाखविल. रडते आहेस आई ? अशावेळीं रडणं बरं ! मन धुवून निघतं. निष्पाप होतं—

**मंजुळा**—थांब जगू—मन धुवायचं कारण नाहीं. मी निष्पापच आहें. मी रडतें आहें खरी—पण ती तुझ्यासाठीं नव्हे—माझ्यासाठीं नव्हे—मी रडतें आहें साऱ्या स्त्रीजातीसाठीं—परावलंबी स्त्रीजातीसाठीं. तुला आज कल्पना यायची नाहीं—आज कां ?—केव्हांच ही कल्पना यायची नाहीं. त्यासाठीं स्त्रीजातींत जन्म घ्यावा लागतो—**पत्नी** व्हावं लागतं—

**यादवराव**—मग निघायचं ना आतां ?

**जगन्नाथ**—नाहीं !—

**यादवराव**—तूं कोण सांगणार ?

**जगन्नाथ**—मी कोण ? मी या माझ्या आईचा रक्षणकर्ता !

**यादवराव**—( हंसतो ) रक्षणकर्ता अं ! आधीं आपलं स्वतःचं रक्षण कर आणि मग दुसऱ्याचं रक्षण करायच्या गोष्टी बोल.

**जगन्नाथ**—तुझं रक्षण तरी मीच केलं आहे ना ? तुझी हकिकत जर मी आधींच रघोजीरावांना सांगितली असती—

**मंजुळा**—नाहीं जगू—मी त्यांचं रक्षण केलं आहे !—

**जगन्नाथ**—तूं !—आई, तूं ? तें कसं ?

**मंजुळा**—ती गोळी यांनीं घातली—यांच्या पिस्तुलांतली—मी नुसतं तें पिस्तुल यांच्या हातून काढून घेतलं !

**जगन्नाथ**—होय ?

**यादवराव**—( हंसतो ) असेल—किंवा नसेलही. असलं तर त्याला पुरावा काय ?

**मंजुळा**—पुरावा मी देईन.

**यादवराव**—आतां कोण तुझं ऐकणार ? तूं एकदां साक्ष देऊन चुकली आहेस—आतां बदललीस तर कोण खरं मानील ? पुरे झाली ही बडबड ! गाडीची वेळ होत आली. तुला यायचं आहे कीं नाहीं ? रघोजीराव आले तर—

**जगन्नाथ**—( तिचा हात धरून ) नाहीं—नाहीं—मी तुला जाऊं देणार नाहीं.

**रघोजी**—( प्रवेश करून ) जगू, हात सोड—कुणाचा हात धरला आहेस ?

**जगन्नाथ**—माझ्या आईचा—

**रघोजी**—हीं ढोंगं मला कळतात—

**यादवराव**—पहा तर खरं !—

**रघोजी**—चूप—जगू, हात सोड तिचा.

**जगन्नाथ**—नाहीं. कबुली दिल्याशिवाय मी हात सोडणार नाहीं—माझा प्राण घेतलात तरी हात सोडणार नाहीं—

**रघोजी**—कसली कबुली ?

**जगन्नाथ**—या बेरडाबरोबर न जाण्याची—

**रघोजी**—कुठं न जाण्याची ?

**जगन्नाथ**—हें घर सोडून—तुम्हांला सोडून—अब्रू सोडून—प्राणापेक्षांही प्यारी अशी अब्रू सोडून—या बेरडाबरोबर—

**यादवराव**—कोण बेरड ? प्रत्यक्ष धन्याला गोळी घालणारा—

**रघोजी**—पिस्तुलाची गोळी घालणारा—( यादवराव चमकतो ) बेइमान बेरड !

**यादवराव**—तुम्हीं स्वतःच पाहिलं होतं म्हणून बरं—बरे झालांत म्हणून बरं—नाहींतर या कोवळ्या बेरडानं वाटेल त्याच्यावर वाटेल ते आरोप केले असते !

**रघोजी**—खरं आहे—मी **पाहिलं** होतं—मी **स्वतः ऐकलं** म्हणून बरं ! सांगूनसुद्धां खरं वाटलं नसतं. केवढा मोठा बेरड अं !

**मंजुळा**—आपला गैरसमज होतो आहे—कळलं ?—नित्याप्रमाणंच आपली दिशाभूल होते आहे. जगू, सोड माझा हात. मी राहिलें. आतां काय व्हायचं असेल तें होवो—मी जावं अशी देवाची इच्छा नाहीं, हेंच खरं. ( एका बाजूला जाऊन बसते. )

**यादवराव**—ठीक आहे—मी जातों तर—( जावयास निघतो )

**जगन्नाथ**—कुठं चाललास ? आधीं—

**रघोजी**—जग्या, बाजूला हो—

**यादवराव**—पहा तर खरं. रघोजीराव, आपले फार उपकार झाले. आपल्या सहवासांत माझे दिवस जसे आनंदांत गेले, तसंच माझं कामही पुष्कळच झालं. बिहारांत भूकंप झाला आहे, तिथल्या अपंगांची सेवा करण्यासाठीं मी जातों आहें. पुनः आपली भेट व्हायचा योग केव्हां येईल—

**रघोजी**—कुणालाच सांगतां येणार नाहीं !

**यादवराव**—वादळांतल्या गलबताचे फुटके तुकडे केव्हां भेटतात-केव्हां दूर होतात ( हंसतो ) तसंच हें आहे. ( नागोजी व चिमणी येतात )

**रघोजी**—आधीं असं करा. पोलिसांना बोलावून आणा. हा निसटलेला कैदी आधीं त्यांच्या ताब्यांत दिला पाहिजे !

**नागोजी**—रघोजीराव—

**रघोजी**—गप्प बसा—माझ्या कारभारांत कुणी तोंड घातलेलं मला मुळींच खपायचं नाहीं. जा—यादवराव—पोलिसांना घेऊन या आधीं. ( यादवराव जातो) आतां तुझा समाचार ! जगू—

**चिमणी**—( त्याचे पाय धरून ) दया करा—रघोजीराव—दया करा. मी तुमच्या पायां पडतें. मला आपली धर्मकन्या समजा आणि त्यांना जाऊं द्या. ते पुनः तुमच्या दृष्टीला सुद्धां पडणार नाहींत.

**नागोजी**—रघोजीराव, ईश्वरानं तुमचं जिवावरचं संकट दूर केलं आहे. आतां या बिचाऱ्याच्या जिवावरचं संकट दूर करायला देवाची दया हृदयांत आणा.

**रघोजी**—दूर व्हा. माझा जो निश्चय झाला आहे तो आतां कालत्रयीं बदलणार नाहीं. जें करायचें तें मी करणार आणि त्यावेळीं दयामाया माझ्या मनाला शिवणार सुद्धां नाहीं. यापूर्वीं नव्हतीच !—

**मंजुळा**—( एकदम पुढें येऊन ) काय करणार ? याला पोलिसच्या ताब्यांत देणार ? मी इथं उभी असतांना कसे कोण त्याला पोलिसांत देतात तें तरी पाहातें.

**रघोजी**—बुरखा ओढ आधीं.

**मंजुळा**—नाहीं. आतां या उजळ माथ्यानंच मला तुमची कानउघाडणी करायची आहे.

**रघोजी**—( तिला लोटून ) चल दूरं हो. लाज नाहीं वाटत माझ्यासमोर उभं राहायला ? जगू, असा पुढं ये—( जगू समोर येतो ) तो खुंटीवरचा हंटर घेऊन ये. हंटर आण. ( जगू हंटर आणण्यासाठीं जातो, तोंच बाबाजी व बायजा येतात आणि त्याचे पाय धरतात. )

**बायजा**—दया करा—दया करा—**मला** हंटरानं मारा—पण **त्याला** सोडा.

**चिमणी**—मांग—कसाब—जळून खाक कसा होत नाहीं मेला !

**रघोजी**—जगू—हंटर इकडे आण. ( जगू चाबूक देतो. )

**बायजा**—( जगूला कवटाळून ) मारा—आतां खुशाल मारा. आईची पाखर पोटच्या पिलाची कशी राखण करते तें तरी पहा.

**नागोजी**—रघोजीराव, मेलेल्याला मारण्यांत काय पुरुषार्थ? थोडा विचार करा—

**रघोजी**—विचारच करतों आहें. मेलेल्यालाच मार दिला पाहिजे. कां मरावं त्यानं? कां गाढवपणा करावा? डोळे उघडून कां पाहूं नये? देवानं दिलेला मेंदू-देवानं दिलेलं काळीज कां वापरूं नये? जगू, असा पुढं ये—( तो पुढें येतो ) हा चाबुक घे आणि लगाव फटका.

**जगन्नाथ**—कुणाला?

**रघोजी**—मला—या रघोजीला—या निर्बुद्ध चढेल मूर्खाला! समजलास? असा फटका देशील कीं पहिल्याच फटक्याला काळजाचा एक तुकडाच खालीं पडला पाहिजे. रघोजीलासुद्धां काळीज आहे, हें या सर्वांना दिसलं पाहिजे. ( जगू चाबूक फेंकून देतो. रघोजी एकदम त्याचे पाय धरतो. ) क्षमा कर, जगू, मला क्षमा कर. ( जगू त्याला उचलून मिठी मारतो ) बाबाजीराव, बायजाबाई, मला क्षमा करा. खाल्ल्या अन्नाशीं बेइमान झालेल्या या अधमाला क्षमा करा. सुभेदार, सूडाच्या बुद्धीला केव्हांही यश नाहीं. ऐकलंस ए, सूडाच्या बुद्धीला यश नाहीं!

**जगन्नाथ**—ऐकलंस आई? देवानं मार्ग दाखवला. झाली खात्री? ( पांडू निकम येतो ) कोण? तूं?

**पांडू**—माझं रक्षण करा. चला. पळा. मीही तुमच्याबरोबर येतों. आतां मला देखील तुरुंगांत टाकतील!

**नागोजी**—कोण हा? हा काय प्रकार आहे? हें असं कसं झालं? कोण हा?

**जगन्नाथ**—माझा उद्धारकर्ता. स्वतः बंधनांत पडून यानंच मला सोडवलं.

**बाबाजी**—कोण पांडू? मी तुला ओळखलं नाहीं. अन्नाला जागलास बाबा!—पण आतां पुढं काय? हें कोडं कसं सुटणार? पोलिस येतील—

**पांडू**—होय-पोलिस येताहेत. म्हणूनच मी सावध करायला आलों. तो यादवराव चौकीवर गेला. त्यानं फौजदारांना सांगितलं—

**रघोजी**—स्वस्थ रहा. हा जसा अन्नाला जागला, तसाच हा रघोजीही अन्नाला कसा जागतो पहा. यावेळीं कुणी कांहीं विचारूं नका. सारी मंडळी आंत चला. जगू, तूं इथंच रहा. चला आंत. (जगू व चिमणीखेरीज सर्व आंत जातात.) चिमा, चल आंत.

**चिमणी**—चाबुक कुठं आहे?

**रघोजी**—पोरगी म्हणून गय करीन असं वाटलं का तुला?

**चिमणी**—जा घरांत. कळली बहादुरी चाबकाची आणि चाबुकवाल्याची.

**रघोजी**—बरं—बरं—समजलों. बरं का जगू—(त्यांना डोळा घालून जातो.)

**जगन्नाथ**—कसं काय? आतां पोलिस येणार—मला पकडून नेणार!

**चिमणी**—नेणारच! पळालांत कां?

**जगन्नाथ**—तूं शपथ कां घेतली नाहींस?

**चिमणी**—तुम्हींच नको म्हटलंत ना?

**जगन्नाथ**—मी वाटेल तें म्हटलं—पण तुला कांहीं दयामाया होती कीं नाहीं?

**चिमणी**—मोडण्यासाठीं का शपथ घ्यायची?

**जगन्नाथ**—तेंही खरंच! पण आतां मला शिक्षा झाली तर?

**चिमणी**—छान होईल! तुम्हांला माहित नाहीं. मुंबईला नव्हतां कीं नाहीं तुम्ही?—तिथल्या मुली मोठ्या विलक्षण. ज्याला तुरुंगाची शिक्षा झाली नाहीं त्याच्याशीं लग्न करायचंच मुली नाकारतात.

**जगन्नाथ**—होय? तर मग तुरुंगांत गेलंच पाहिजे.

(**भैरवी**-त्रिताल)

**निरखुनि मधुर वदनकमला। प्राण रमला।**
**केंवि कुटिल रमणि नयनकिरणिं हंसवि मला॥ धृ॥**
**प्रणयबंधना बंदि अभिधान। प्रेमदान हरिल भान।**
**अजाण जिवा धरिल करिं। सहज फसवि मजला॥ १॥**

पण तुरुंगांत जायच्या आधीं चतुर्भुज व्हावं लागतं ना? (तिंचे दोन्ही हात धरून) चिमणा—माझ्या जिवा—

(पोलिस व यादवराव येतात.)

**यादवराव**—हा पहा तो बदमाष! पकडा याला! (तेंच वाक्य म्हणत रघोजी येतों. पोलीस जगूला धरतात)

**रघोजी**—याला नव्हे—याला—या यादवरावाला—यानं मला गोळी घातली! (सर्व बाहेर येतात.)

**सर्व**—यादवरावानं गोळी घातली?

**मंजुळा**—होय. यांनीं गोळी घातली. जगूला **माझा** संशय आला आणि **माझी** अब्रू राखण्यासाठीं जगूनं फांसाच्या दोरीला आपली मान दिली.

**चिमणी**—होय?

**जगन्नाथ**—आतां ऐकलंच आहेस!

(पोलीस यादवरावाला बेड्या घालतात)

**पोलीस**—मला जगन्नाथालाही पकडलं पाहिजे—आणि या पांडू वॉर्डरला—

**रघोजी**—त्यांना जामिन मी आहें. त्यांचं काय व्हायचं तें मी पाहून घेईन. सरकारांकडे माझं वजन आहे. जा आतां याला घेऊन.

**लहानू**—(प्र. क.) खून—चाबूक—बापाचं नांव—आड नांव—धरणी कंप!—(यादवरावाला घेऊन जातात.)

**रघोजी**—लहान्या—तो चाबूक इकडे आण.

**लहानू**—म्यां काय केलं जी?

**रघोजी**—चाबूक आण म्हणतों ना? (लहानू चाबूक उचलतो) तो चाबूक नेऊन नदींत फेकून दे. आजपासून या घरांत चाबूक बंद.

**लहानू**—जी! (चाबूक फटकावतो)

**जगन्नाथ**—केवढा मी भाग्यवान! ही एक आई—ही एक आई!

**चिमणी**—आणि मी ?

**जगन्नाथ**—चिमणे, तूं आई व्हायला अजून पुष्कळ अवकाश आहे. आधीं मी बी. ए. होणार—मग अमेरिकेला जाणार—

**रघोजी**—माझ्या जगूचा सारा खर्च मी देणार—

**चिमणी**—बरं-बरं-कळलं !

**जगन्नाथ**—आई-आई-केवढा हा आनंद !

( पडदा )

ॐ तत्सत्